# महात्मा गांधींचें दर्शन

[ १९४३ च्या गांधी सप्ताहानिमित्त आचार्य शं. द. जावडेकर यांनीं येरवडा तुरुंगांत दिलेलीं प्रवचनें. ]

लेखक

पां. स. साने गुरुजी



प्रथमावृत्ति ] किंमत २॥ रुपये [ सन १९४८

# प्रकाशकाचें निवेदन



पूज्य साने गुरुजी यांच्या आत्यंतिक प्रेमामुळेंच वाचकांस महात्मा गांधींचें दर्शन घडविण्याचा मला सुयोग येत आहे. इतर अनेक कामें मागें असतांनाही निर्व्याज आपुलकीनें गुरुजींनीं वेळांतवेळ काढून या पुस्तकाच्या प्रसिद्धीस परवानगी दिली. वास्तविक हीं प्रवचनें आचार्य जावडेकरांनीं येरवडा तुरुंगांत दिलेलीं. त्यांचीं टांचणें गुरुजींकडे होतीं; त्यावरून त्यांनीं हीं प्रवचनें 'मन्वन्तर' मासिकाच्या वाचकांसाठीं खास लिहून काढलीं. आचार्य जावडेकरांनींही ती प्रसिद्धीस परवानगी दिली व त्याचीं मुद्रितें नजरेखालून घातलेलीं आहेत. या त्यांच्या सहकार्याबद्दल प्रकाशक आपली कृतज्ञता व्यक्त केल्याशिवाय कसा राहील !

प्रकाशक— नारायण लक्ष्मणराव कोकाटे,
३०० सदाशिव पेठ, पुणें २.

मुद्रक— भाऊ लक्ष्मणराव कोकाटे, हनुमान छापखाना,
३०० सदाशिव पेठ, पुणें २.

# प्रास्ताविक दोन शब्द

१९४२ च्या सत्याग्रह संग्रामाच्या निमित्तानें येरवडा तुरुंगांत बंदीत असतांना १९४३ च्या ऑक्टोबर अखेर गांधीसप्ताह साजरा करण्यांत आला. त्यावेळीं सहकारी राजबंदीपुढें मीं सात प्रवचनें दिलीं. त्यावेळीं हीं प्रवचनें कोणी लिहून घेत असेल व तीं प्रसिद्ध करण्याचा सुयोग येईल अशी मला कल्पनाहि नव्हती. यानंतर १९४४ च्या एप्रिलमध्यें मी तुरुंगांतून सुटलों. पुढें तीन साडेतीन वर्षांनीं श्री. कोकाटे यांचें एक पत्र मला आलें व त्याच्या-बरोबर माझ्या या प्रवचनांपैकीं पहिल्या प्रवचनाची पेजप्रुफेंहि आलीं ! "श्री साने गुरुजी यांनीं आपलीं सात प्रवचनें लिहून घेतलीं आहेत व त्यांनें पुस्तक काढण्याची त्यांची इच्छा आहे तरी आम्हांस तशी परवानगी असावी" अशी विनंती श्री. कोकाटे यांच्या पत्रांत होती. मला हें पत्र वाचून आनंद तर झालाच, पण आश्चर्यहि वाटलें, श्री. साने गुरुजी माझ्या प्रवचनांना इतकें महत्त्व देतील व ते तीं लिहून ठेवतील याची मला मुळींच कल्पना नव्हती.

या पुस्तकांतील विचार माझे आहेत व शब्दहि बहुतांशीं माझेच आहेत; पण गुरुजींच्या लेखणीचा स्पर्श झाल्यानें त्यांना प्रसन्नता प्राप्त झालेली आहे. हा गुरुजींचा माझ्यावर एक प्रसादच आहे असें मी समजतों. आमच्या दोघांच्या तुरुंगांतील एकत्र सहवासाचें हें एक मूर्त स्मृतिचिन्ह आहे. याच दृष्टीनें मला हें पुस्तक अत्यंत प्रिय आहे. गुरुजींनीं लिहिलें तसेंच तें मराठी वाचकांपुढें जात आहे. याबद्दल मी गुरुजींचा व श्री. कोकाटे यांचाहि आभारी आहें.

शिवाजी नगर, पुणें नं. ५
ता. ५-१०-४८

शं. द. जावडेकर

# निवेदन



बेचाळीसच्या स्वातंत्र्ययुद्धांतील तुरुंगवासांत महाराष्ट्रांतील महान् ध्येयार्थी विचारवंत आचार्य जावडेकर यांचीं बौद्धिकें, प्रवचनें ऐकायला मिळालीं. आचार्य भागवतांचीं जागतिक तत्त्वज्ञानावरचीं ५०-६० तेजस्वी प्रवचने मी पकडला जाण्याआधींच होऊन गेलीं होतीं. नाहींतर तोहि अमर लाभ झाला असता. भरभर टिपून घेण्याची मला संवय. पूज्य विनोबाजींचीं गीताप्रवचनें ३२ सालीं धुळें तुरुंगांत टिपून घेतलीं. तीं आतां प्रसिद्ध झालीं आहेत. ४३ मध्यें अचार्यांनीं गांधीजयन्ति सप्ताहांत महात्माजींच्या दर्शनावर, तत्त्वज्ञानावर सात प्रवचनें दिलीं तीं मीं येथें दिलीं आहेत. क्वचित् संदर्भ तुटला असेल. कोठें अर्थबोध स्पष्ट नसेल, तर तो माझा दोष आहे. घाईत टिपून घेतांना राहून गेले असतील कांहीं शब्द, काहीं विचार. या प्रवचनांत जें चांगलें आहे. तें आचार्यांचें. त्यांना सारें श्रेय. मी केवळ लेखक. जे दोष असतील त्यांची क्षमा मागण्यापलीकडे मी काय करूं ?

पां. स. साने

# महात्मा गांधींचें दर्शन

## प्रकरण १ लें

आज भाद्रपद वद्य द्वादशी. या तिथीला जी तारीख येते तिच्या पासून आरंभ करून दोन आक्टोबरपर्यंत आपण गांधीजयंतीसप्ताह पाळीत असतों भाद्रपद वद्य द्वादशीस पंचांगाप्रमाणें महात्माजींचा जन्म झाला इंग्रजी जन्मतारीख २ आक्टोबर जगभर सर्वत्र २ आक्टोबरलाच गांधीजयंति होते भाद्रपद वद्य द्वादशीस आता रेंटिया बारस म्हणजे चरक्याची द्वादशी असें नाव देण्यात आलें आहे. कारण महात्माजी म्हणजे रेंटिया ते एकदा म्हणाले होते, माझा वाढदिवस साजरा करायचा असेल तर खादी खपवा चरका सर्वत्र न्या म्हणून त्यांच्या जन्मतिथीलाच रेंटिया बारस नाव देऊन गुजराथनें चरका अमर केला. म्हणजेच एक प्रकारें महात्माजींना व त्यांच्या कार्याला अमर केलें आहे असा हा गांधीजयंतीसप्ताह आपण आजपासून सुरू करीत

आहोंत. या सप्ताहाच्या कार्यक्रमात गांधीतत्त्वज्ञान किंवा गांधीदर्शन या विषयावर सात दिवस सात प्रवचनें देण्याचें मीं योजिलें आहे. महात्मा गांधी हे आज २५।३० वर्षें आपल्या पुढें सतत उभे आहेत. नाना स्वरूपात उभे आहेत महान् क्रान्तिकार्य त्यानीं चालविलें आहे. आपणहि सारे त्यांच्या या कामामध्यें आपापल्या शक्तीप्रमाणें भाग घेत आहोंत. महात्मा गांधींचें चरित्र जगाला नवीन दृष्टिकोण देणारें असल्यामुळें त्याला गांधी–दर्शन किंवा सत्याग्रहदर्शन असें नाव द्यायला हरकत नाहीं आज आपल्या देशात अनेक दर्शनें रूढ आहेत निरनिराळीं दर्शनें मोठमोठया विभूतींनीं या देशाला प्राचीन काळापासून दिलीं आहेत. परंतु महात्मा गांधींनीं आणखी एक नवीन दर्शन दिलें आहे, अशा श्रद्धेनें आपण त्यांच्याकडे बघतों, त्यांच्या कार्यांत सामील होतों महात्मा गांधींच्या चरित्राच्या द्वारां हें नवीन दर्शन, हें नवीन तत्त्वज्ञान जगाला मिळत आहे, या निष्ठेनें आपण त्यांचें शक्त्यनुसार अनुसरण करीत आहोंत

ज्या वेळेस एखाद्या पुढाऱ्याच्या विचारास आपण दर्शन असें नाव देतों, त्या वेळेस ते विचार आपल्या जीवनाच्या सर्व अंगाना स्पर्श करणारे आहेत असें आपण समजत असतों. जीवनाच्या संपूर्ण तत्त्वज्ञानाला आपण दर्शन हें नाव देत असतों. सारें जीवन अंतर्बाह्य कसें आहे व तें कसें असावें याचें अचूक व सम्यक् दर्शन जो महापुरुष घडवितो, त्याच्या विचारांना, त्याच्या तत्त्वज्ञानाला आपण दर्शन ही पारिभाषिक संज्ञा देत असतों अशीं दर्शनें जगात निरनिराळ्या वेळीं रूढ होत असतात. आजहि

आहेत महात्मा गांधींकडे केवळ एक मोठे राजकीय पुढारी एवढयाच दृष्टीनें आता आपण पहात नाहीं जगहि एवढयाच अर्थानें पहात नाहीं आज जगात सर्वतोमुखीं " आम्हास नवीन जग निर्मावयाचें आहे, " ही भाषा ऐकू येते ही भाषा राजकारणाहून अधिक व्यापक आहे. एखादी नवीन शासनपद्धतीच फक्त आम्हास निर्मावयाची आहे असें नाहीं, एखादें नवीन राष्ट्रच फक्त निर्मावयाचें आहे असें नाहीं, तर नवीन जग निर्मावयाचें आहे हें ध्येय आज सर्वांसमोर उभें आहे हे ध्येय सर्वत्र उच्चारिलें जात आहे. सर्व जनतेंत नवीन जग निर्माण करण्याची आशा आकांक्षा आज उत्पन्न झाली आहे. आणि जनतेंत सर्वत्र उत्पन्न झालेली जी ही आशा तिच्या पूर्तीसाठीं, हें नवीन जग प्रत्यक्षात यावें. यासाठीं आज जगात अनेक लोक प्रयत्न करीत आहेत असे प्रयत्न करणाऱ्यापैकींच महात्मा गांधी हेहि एक आहेत कोणी शस्त्रबळानें युद्ध करून नवीन जग निर्मूं पाहात आहेत कोणी शस्त्रबळानें क्रान्ति घडवून आणून जगाचा कायापालट करूं पाहात आहेत. एखादें युद्ध पुकारून त्यात मिळणाऱ्या विजयातून नवीन दुनिया पैदा करूं, नवें जग निर्मूं अशी आशा कोणी उराशीं बाळगून आहेत परंतु या मार्गांनीं नवीन जग निर्माण होईल असें महात्मा गांधींना वाटत नाहीं. महात्मा गांधींचें जीवनाचें दर्शन या लोकांच्या दर्शनापेक्षा निराळें आहे त्यांनीं गेलीं २०।२५ वर्षे किंवा आफ्रिकेंत असल्यापासून जो प्रयोग सुरू केला आहे, ज्या अनेक चळवळी त्यांनीं केल्या व करीत आहेत, त्या सर्वांच्या

बुद्धाशीं असें एक तत्त्वज्ञान आहे, असें एक विशाल दर्शन आहे की त्याला इतिहासात दुसरा दाखला नाहीं महात्मा गांधी क्रान्तिकारी आहेत परंतु आजपर्यंत होऊन गेलेल्या सर्व क्रान्तिकारकाहून ते निराळे आहेत ते एक थोर धर्म पुरुष आहेत परंतु आजपर्यंत होऊन गेलेल्या धर्मपुरुषाहून-हि ते विभिन्न आहेत ते एक थोर राजकीय नेते आहेत परंतु इतर सर्व राजकीय नेत्याहून ते निराळे आहेत त्यांची विभूति अशी सर्वांहून भिन्न असली तरी ते पुन पुन्हा सांगत असतात कीं मी जें काहीं सांगत आहे, मी जीं तत्त्वें सांगत आहे त्यांत नवीन असें काहीं नाहीं मी पूर्वीचीच तीं सनातन तत्त्वें सांगत आहे महात्माजी जरी असें म्हणत असलें तरी त्या जुन्या तत्त्वांच्या आचरणासंबंधीं ते नवीन दृष्टि देत आहेत यात शंका नाहीं महात्माजी जें सांगत आहेत तें जुने हि नाहीं व नवीनहि नाहीं ते जीं तत्त्वें सांगतात तीं जुनीं म्हणजे शिळीं या अर्थानें सांगत नाहीत काहीं तरी नवीन अर्थ त्या जुन्या तत्त्वात ते ओततात आणि यामुळेंच सर्व हिंदी जनतेचें चित्त त्यांनीं ओढून घेतलें आहे. नवीन हिंदी राष्ट्र निर्माण करण्यासाठीं झगडणारी जी कॉंग्रेस संस्था तिचें चित्त त्यांनीं ओढून घेतलें आहे आणि कॉंग्रेसच्या नेतृत्वामुळें राजकीय पुढारी म्हणून आज जगापुढें ते आहेत कॉंग्रेस मध्यें ते आले व राजकारण हा त्यांचा नित्याचा एक व्यवसाय झाला परंतु त्यांचा संदेश राजकारणापुरताच नाहीं. राजकारण म्हणजे काहीं संपूर्ण जीवन नाहीं राजकारणाच्या मर्यादा ते जितक्या समजतात तितक्या अन्य कोणासहि समजलेल्या नाहींत.

महात्मा गांधींसारखी अलौकिक विभूति जनतेच्या संसारांत जेव्हां उतरते, एखादें नवीन तत्त्वज्ञान घेऊन जेव्हां ती जनतेसमोर येते, तेव्हां ती केवळ शब्दपांडित्यानें पुढें येत नसते. अशी विभूति आपल्या आचरणानें जगासमोर येते; ही महत्त्वाची गोष्ट आहे. गीतेवर लिहिलेल्या अनासक्तियोगाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं म्हटलें आहे, "गीतेचा केवळ शास्त्रीय पांडित्याच्या दृष्टीनें विचार करण्याची माझी पात्रता नाहीं. परंतु त्या तत्त्वांचें आमरण आचरण करण्याची खटपट करणारा या दृष्टीनें माझी पात्रता आहे." अशा अर्थाचे त्यांचे शब्द आहेत. कोणत्याहि तत्त्वज्ञानाचें रहस्य काय, त्या तत्त्वज्ञानाचें मर्म काय, असा जेव्हां प्रश्न समोर येतो, तेव्हां त्याचें अनुकरण करून पाहा हेंच उत्तर असतें. प्रत्यक्ष व्यवहार हीच त्या तत्त्वज्ञानाची कसोटी. ज्या व्यवहारांत आपणांस रहावयाचें असतें त्या व्यवहारांतच जर तें तत्त्वज्ञान आपण आणूं लागलों तरच त्याचें रहस्य कळेल आणि याच दृष्टीनें महात्माजींनीं अनासक्तियोग पुस्तक लिहिलें, आणि भगवद्गीतेच्या अर्थासंबंधानें ज्या निरनिराळ्या मीमांसा आजपर्यंत झाल्या, त्यांहून नवीन दृष्टि त्यांनीं दिली आहे.

अनासक्तियोग हें छोटें पुस्तक आहे. भगवद्गीतेंतून अहिंसा धर्म निघूं शकतो असें त्यांत महात्माजी सांगतात. भगवद्गीतेंत अहिंसा आहे. ही गोष्ट आपल्या जड बुद्धीला समजली नसती. असें कोणी पूर्वी सांगता तर आपण हसलों असतों; परंतु नव्या दृष्टीनें पूर्वीच्या ग्रंथाकडे पाहण्याची दृष्टि आली म्हणजे मग वाटूं लागतें कीं महात्माजी म्हणतात तें बरोबर असूं शकेल. ही नवी दृष्टि देणारा मनुष्य भेटला पाहिजे.

असा मनुष्य भेटला कीं सामान्य माणसालाही मग तें सारें बरोबर वाटूं लागतें सत्य, अहिंसा हे शब्द नवीन नाहींत. हीं तत्त्वें नवीन नाहींत. परंतु या तत्त्वाचा व्यवहाराशीं कोठें कसा संबंध आणायचा हा प्रश्न असतो आणि जेव्हां हीं तत्त्वें व्यवहारात आणण्याची धडपड सुरू होते तेव्हां सत्यनिष्टेला निराळाच अर्थ येतो. अहिंसाव्रत पाळा असें आजपर्यंत अनेकांनीं सांगितलें आहे परंतु अहिंसाव्रत पाळणाऱ्यानें, सत्याचें व्रत पाळणाऱ्यानें, जुलमी कायदा मोडावा हें आजपर्यंत कोणी सांगितल्याचें उदाहरण नाहीं. राजकारणात सत्य, अहिंसा पाळा असें सांगणारा कोणी आजपर्यंत झाला नाहीं. सत्यासाठीं, अहिंसेसाठीं राजकारणाचा संन्यास घेतलेले, राज्यें, साम्राज्यें सोडून भागीरथीच्या तीरावर किंवा हिमालयांत जाऊन बसलेले असे ध्येयार्थी लोक आपणास दिसतात अशा सर्व-संन्यास वृत्तींतच परम आनंद आहे असें मानणारे व सांगणारे पुरुष झाले पूर्वी झाले, आजहि असतील. जो मोक्षार्थी आहे, ज्याला मोक्षाची तळमळ आहे, त्यानें कुटुंब, राज्य, व्यवहार, हा संसार याचा त्याग करूनच गेलें पाहिजे असें ते सांगत. भौतिक सुखापेक्षां अशा संन्यासात अधिक आनंद आहे असें ते म्हणत. सर्व धर्मांतून असें सांगितलेलें आहे असें वर्तनच आत्मप्राप्तीचें खरें साधन अशी घोषणा सर्व धर्म करतात खरा आनंद संसारात नसून परमार्थात आहे असें सांगणारे महात्मे आजपर्यंत झाले आणि अशा मोक्षार्थी ऋषीमुनींनी, यतींनीं, राजधर्माचा संन्यास करून एखादा राजा निवृत्त होत असेल तर त्याला तू राज्य सोडूं

नकोस, जी काहीं हिंसा होईल ती अपरिहार्य समजून वाग असें सांगून प्रवृत्त केलें आहे. राजे लोकांना वाटें कीं यति धर्म श्रेष्ठ आहे आमच्या राजधर्मांत हिंसा, अन्याय, अप्रामाणिकपणा पदोपदीं येतात प्रसंगीं कठोर व्हावें लागतें, शासन करावें लागतें, सत्य मोडावें लागतें, दंभ दाखवावा लागतो. हा राजधर्म पापमूलक आहे नकोच हा. असें म्हणून काहीं राजे खरोखरच निवृत्त होऊं पाहात. श्री शिवाजी महाराजहि एकदा निवृत्त होऊं पाहात होते तुकाराम महाराजांनी त्यांना सांगितलें, " तू समर्थांकडे जा " शिवाजी महाराज समर्थांकडे गेले समर्थांनीं सांगितलें, "शिवबा, लोकसंग्रह व समाजधारणा यासाठीं स्वधर्म सोडून जाऊं नका. जी काहीं कठोरता तुमच्या धर्मांत येईल ती अपरिहार्य समजा " अशा उपदेश आजपर्यंत सारे करीत आले. राजकारणात हिंसा, असत्य असणारच, अपरिहार्य आहेत या गोष्टी. अनासक्तबुद्धीनें त्या गोष्टी कराव्या असें सांगत. लोकमान्य टिळकहि असेंच सांगतात -

वास्तविक धर्माला असा उपदेश करावा लागतो कीं संसारांत फार नका रमूं परमार्थाकडे लक्ष द्या नेहमीं धर्मग्रंथातील संवादातून पूर्वपक्षी हा संसाराची बाजू घेणारा असतो. आणि त्याला उत्तर देणारा उत्तरपक्षी हा परमार्थाचा उपदेश करीत असतो परंतु आपणास गीतेंत निराळाच देखावा दिसतो येथें अर्जुन निवृत्त होऊं पाहात आहे परमार्थाकडे जाऊं पाहात आहे, तर गीता त्याला निवृत्त न होऊं देता कर्मप्रवृत्त करीत आहे गीता संन्यासमार्गी आहे, सर्व संसार सोडून जाऊं पाहणाऱ्यास कर्मप्रवृत्त कर-

णारी आहे, निवृत्तिधर्मीयांस प्रवृत्तीच्या पक्षाच्या बाजूनें उत्तर देणारी म्हणून गीता आहे, असें आपण मानीत आलों तें कांहीं खोटें नाहीं. परंतु महात्मा गांधींनीं जी भूमिका घेतली आहे, ती प्रवृत्तीची असली तरी गीतेहून निराळी आहे. ते आपल्या भूमिकेवरून एक निराळीच दृष्टि देत आहेत. राजकारणांत हिंसा आहे वगैरे शंका घेणाऱ्यांस महात्माजी असें नाहीं उत्तर देत कीं 'अपरिहार्य समजून अनासक्त राहून ती हिंसा तूं कर. ते निराळ्याच रीतीनें शंका निरसन करूं पाहतात. राजकारण, व्यवहार वगैरेंत पूर्वजांनीं ज्या मर्यादा घातल्या आहेत, त्या सोडून पुढें जाण्याचा काळ आला आहे. पूर्वीच्या धर्मस्थापकांनीं, यति-मुनींनीं ज्या मर्यादा सांगितल्या, ज्या अनुज्ञा सांगितल्या, त्या आवश्यक नसून क्षम्य आहेत. राजानें हिंसा केलीच पाहिजे असा त्याचा अर्थ नसून त्यानें हिंसा केली तर ती क्षम्य आहे असा अर्थ आहे. परंतु क्षम्य म्हणून Permissible म्हणून जी गोष्ट सांगतली ती कर्तव्य नाहीं ठरत. आपद्धर्म म्हणून ती आहे. ती गोष्ट obligatory केलीच पाहिजे अशी नाहीं. कर्तव्यें व्यवहारांत आणतांना अपरिहार्य म्हणून त्यांनीं कांहीं अनुज्ञा दिल्या. परंतु शेवटीं एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं आपणास आपला व्यवहार दिवसेंदिवस अधिक उच्च पातळीवर न्यावयाचा आहे. व्यवहार व्यवहार असें म्हणत बसून कर्तव्यें खालीं ओढावयाचीं नाहींत. महात्मा गांधी भगवद्गीतेकडे या दृष्टीनें पाहतात. या दृष्टीनें तिचें विवेचन करूं पाहतात. राजकारणांत ज्या गोष्टी घडत आहेत, घडत आहेत, त्यांच्या निराकरणार्थ मी म्हटलों

आहे असें त्यांनीं अनेक वेळां सांगितलें आहे. महात्मा गांधींची जी राजकीय भूमिका आहे ती पूर्वी कोणीहि घेतलेली नाहीं. पूर्वी म्हणत राजकारण करा तें करतांना जी हिंसा वगैरे करावी लागेल ती निर्वैर बुद्धीनें, अनासक्त रीतीनें करा. पूर्वीच्या लोकांनीं अहिंसा, सत्य इत्यादि तत्त्वांचाहि जणूं श्रमविभाग केला. बुद्ध, खिस्त, महावीर यांनीच यतिधर्मात संपूर्ण अहिंसा आणली. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत, राजकारणांत अहिंसा कशी आणतां येईल तें त्यांनीं सांगितलें नाहीं. तसा प्रयत्नहि कोणी केला नाहीं. महात्मा गांधी आज असें म्हणतात कीं मी सत्य, अहिंसा इत्यादि तत्त्वें सर्व जीवनांत आणण्याचा प्रयत्न करीत आहे. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत, समाज, राजकारण, धर्म सर्व ठिकाणींही सनातन तत्त्वें आणण्यासाठीं मी झटत आहे. यामुळेंच महात्माजी आज नवीन दर्शन देत आहेत. पूर्वजांचे प्रयोग आणखी पुढें नेत आहेत. त्यांत भर घालीत आहेत. नवीन दृष्टि व नवीन अनुभवाचें तत्त्वज्ञान देत आहेत. ते आज म्हणतात कीं, सत्यनिष्ठ व्हायचें रहावयाचें असेल त्यानें सरकारशीं झगडलें पाहिजे. अन्याय्य सरकारशीं जोंपर्यंत आपण झगडत नाहीं तोंपर्यंत आपण सत्यनिष्ठ आहोंत, धर्मनिष्ठ आहोंत, अहिंसक आहोंत, असा दावा करणें खोटें आहे. हीं थोर तत्त्वें आपण पाळतों असें म्हणणें खोटें आहे. महात्माजी राजकारणांत शिरले ते जगाची सुधारणा करावी म्हणून नाहीं शिरले. या वृत्तीनें ते राजकारणप्रवृत्त झाले नाहींत. स्वतःची सुधारणा करण्यासाठीं म्हणून ते राजकारणांत उतरले. स्वतःची सुधारणा, स्वतःची आध्यात्मिक व

नैतिक सुधारणा करता करता त्याना असें दिसून आलें कीं स्वत ची सुधारणा व जगाची सुधारणा या गोष्टी भिन्न नाहींत त्या एकच आहेत ते दक्षिण आफ्रिकेंत गेले बॅरिस्टर होऊन गेले परन्तु तेथें त्याना लौकरच असें दिसून आलें कीं झगडा केल्याशिवाय स्वत चा धर्म पाळता येत नाहीं मी येथील सरकारशीं झगडा न करीन तर माझा विकास थांबेल, मी कर्तव्यच्युत होईन, मी आत्म्याची प्रतारणा केली असें होईल असें त्याना वाटलें. आणि हा झगडा केवळ माझाच न राहाता तो सर्वांचा झाला पाहिजे, असेंहि त्यांस दिसलें आणि हा झगडा आजपर्यंत कधीं कोणी केला नाहीं अशा पद्धतीनें करायला ते उभे राहिले. सत्यार्थी लोकानीं राजसत्तेविरुद्ध झगडा केल्याचीं उदाहरणें जगाच्या इतिहासात फार थोडीं आहेत आपल्या देशांत फारशी नाहींत व जगाच्या इतिहासांतहि फारशी नाहींत. महात्मा गांधींचा हा प्रयोग असा अपूर्व आहे द आफ्रिकेंत त्याना दिसले कीं मी जर झगडणार नाहीं तर मला धर्म पाळता येणार नाहीं इतरहि बधु न उठतील तर त्यांचेंहि कल्याण नाहीं त्यानीहि या झगड्यात आलें पाहिजे द. आफ्रिकेंतील झगडा तेथाल सर्व हिंदी जनतेचा त्यांनीं केला परन्तु पुढें असें दिसलें कीं दक्षिण आफ्रिकेचा प्रश्न सुटायला हवा असेल तर हिंदुस्थान स्वतत्र केला पाहिजे जोंपर्यंत हिंदुस्थान स्वतत्र होत नाहीं तोंपर्यंत हिंदी जनतेचे, जगांतील गुलामगिरीचे प्रश्न सुटणार नाहींत. म्हणून आफ्रिकेतून येथें येऊन हिंदी जनतेच्या स्वातंत्र्याचा प्रश्न त्यांनीं हातीं घेतला आणि हिंदी स्वातंत्र्यार्थ लढतां लढतां त्याना असें

दिसून आले की हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न जगाशी जोडलेला आहे सार्‍या जगाचीच सुधारणा झाली पाहिजे तोंपर्यंत माझा, देशाचा किंवा इतर देशाचाहि प्रश्न खर्‍या संपूर्ण अर्थानें सुटणार नाहीं अशा रीतीने स्वत च्या काष्ठिधर्मांतून, स्वत च्या वैयक्तिक मोक्षातून ते समष्टीच्या, सर्व जगाच्या धर्माकडे, जगाच्या मोक्षाकडे आले स्वत च्या मोक्षाची त्याना जितकी उत्कट इच्छा आहे, तितकीच जगाच्या मोक्षाचीहि आहे सारें जग सुधारावयाचें असेल तर राजकारण, अर्थकारण, समाजकारण, धर्मकारण हीं अलग ठेवून चाल णार नाहींत ही गोष्ट त्याना स्पष्टपणें दिसली आणि म्हणून ते जरी मोक्षार्थी असले तरी ते राजकारण करू लागले अर्थकारण करू लागले आणि हे सर्व व्यवहार करीत असताना एक नवीन दृष्टि त्यानीं दिली धर्म या सर्व गोष्टींत भरून राहिला आहे, सत्याची व अहिंसेची हवा या सर्वांत खेळती राहिली पाहिजे असें त्यानीं शिकविलें महात्माजींची दृष्टि मोक्षार्थी असली तरी अर्थकारण, राजकारण, समाजकारण, धर्मकारण या सर्वांत ती वावरत असते त्याची चतुर्विध दृष्टि आहे एकांगी नाहीं या चारी गोष्टी सत्य व अहिंसेच्या पायावर उभारता आल्या तरच खरें स्वराज्य लाभेल असें त्याचें मत आहे यालाच ते स्वराज्याचा चौरस Square of Swara असें म्हणतात या चौरसाच्या एका बाजूस अर्थकारण व राजकारण आहे दुसर्‍या बाजूस धर्म व नीति आहे



असा हा चौरस आहे. अर्थकारण आणि राजकारण यात धर्म व नीति आणणें हें महात्माजींच्या जीवनाचें ध्येय आहे. आजपर्यंत जे धर्मशिक्षक झाले त्यांनीं राज्यव्यवहार करताना थोडीशी हिंसा अपरिहार्य आहे असें सांगितलें ही हिंसा ते गृहितच धरून चालले ही हिंसा राजकारणातूनहि कशी कमी करता येईल व एक दिवस अजीबात कशी नष्ट करता येईल याचा विचार आजपर्यंत कोणी केला नाहीं. तसेंच अर्थकारणात, व्यापारांत खोटेपणा थोडा यायचाच, थोडी लबाडी असायचीच असें जणू आपण म्हणत होतों सत्य, अहिंसा इत्यादि तत्त्वें आपण यतींच्या, साधुसंताच्या कप्पा उडात नेऊन ठेवून दिलीं व्यवहारात असें कसें चालेल असें म्हणत बसलों परंतु महात्माजींनीं ही परंपरा झुगारून दिली आहे आजच्या अर्थकारणात अन्याय, पिळवणूक असेल, खोटेपणा असेल तर निराळेंच अर्थशास्त्र निर्मूया असें ते म्हणू लागले चरका, ग्रामोद्योग वगैरेंच्या द्वारा अर्थकारणात ते समता आणा असें शिकवू लागले धर्मकारणातहि सत्य व अहिंसा त्यांनीं आणिला ते सर्व धर्म समान मानतात ज्या अर्थानें महात्माजी सर्व-धर्म-समान याचा स्वीकार करतात त्या अर्थान पूर्वीं कधीं केला गेला नव्हता सर्व धर्म एकच आहेत, हिंदुधर्म, ख्रिश्चनधर्म, मुसलमानी धर्म, बुद्धधर्म इत्यादि धर्म एकाच भूमिकेवर उभे आहेत असें कोणी म्हटलें तर आपणास पटणार नाहीं, परंतु महात्मा गांधी ज्या दृष्टीनें विचार करतात, त्या दृष्टीनें सर्वधर्म समान आहेत, असें मानण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं

*अनासक्ति-योग लिहितांना महात्माजींनीं कोणती दृष्टि*

घेतली आहे ? अर्जुन लढत नसतो. तो युद्ध टाळू पाहातो. श्रीकृष्ण त्याला झगडा करायला उद्युक्त करतात गीता ही युद्धार्थ प्रवृत्त करणारी आहे ही गोष्ट महात्माजी मानतात कोणी म्हणतात की महात्माजी तर अहिंसा शिकवितात. आणि पु हा गीतेला कसे मानतात ? अर्जुन शस्त्र खाली टाकतो महात्माजीहि शस्त्र दूर ठेवा सांगत आहेत महात्माजींची भूमिका व अर्जुनाची भूमिका दोन्ही समान आहेत, असें काहीं प्रवचनकार अद्यापहि सांगतात अर्जुन काय म्हणत होता ?

" यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणय

धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् "॥

अर्जुन म्हणतो " हातीं शस्त्र न घेतलेल्या व प्रतिकार न करणाऱ्या मला जरी कौरवांनीं मारलें तरी तेंही माझ्या कल्याणाचेंच होईल. " अर्जुन नि शस्त्र व अप्रतिकार असा आहे. परंतु महात्माजींची भूमिका निराळी आहे. ते हातीं शस्त्र देत नाहींत, परंतु प्रतिकार करू नका असें त्यांनीं कधींहि सांगितलें नाहीं. अर्जुनाची भूमिका आपण जरा अशी मांडू या, हे इंग्रज आपलेच बंधु आपण जाति, धर्म, देश यांचे भेद लक्षात आणता कामा नये, त्यांना बंधु म्हणूनच आपण मानलें पाहिजे त्यांनीं आपला द्वेष केला तरी त्यांचा आपण नाहीं करता कामा त्यांच्यावर प्रेम करावें. ( भगवद्गीतेनेंहि असा उपदेश ठायीं ठायीं केला आहे त्यात काहीं नवीन नाहीं. ) परंतु भगवद्गीतेच्या शिकवणीचा असा अर्थ नाहीं कीं अन्यायानें कोणी राज्य घेतलें तरी स्वस्थ बसावें आपल्या बंधूनींच राज्य घेतलें. घेईनात का.

काय हरकत? सर्वस्व घेतलें तरी आपण प्रतिकार न करता स्वस्थ बसावें, असें अर्जुन म्हणतो त्यानीं झगडा सुरू केला, तरी आपण निमुटपणें बसावें असें तो म्हणतो परतु अर्जुनाची ही भूमिका मान्य केली तर जगाचें, समाजाचें, सस्कृतींचें रक्षण होणार नाहीं म्हणून श्रीकृष्णानीं अर्जुनास या नैष्कर्म्यापासून परावृत्त केलें. अर्जुनानें अहिंसावादाच्या दृष्टीनें प्रश्न केलाच नाहीं तो का अहिंसेला कटाळला होता? नाहीं अहिंसेचा पूर्वपक्षहि त्यानें केला नाहीं अहिंसेचा मुद्दा त्यानें काढलाच नाहीं म्हणून त्या मुद्याचें गीतेंत खडनहि नाहीं अर्जुनाची भूमिका एवढीच होती कीं, नातलगाची, आप्तेष्टाची, गुरुजनाची हिंसा करावी कीं नाहीं ज्ञानेश्वरींत अर्जुनाची भूमिका फार उत्कृष्ट रीतीनें माडलेली आहे

आम्ही दिगतीचे भूपाळ। विभाडूनि सकळ
मग सतोषविजे कुळ। आपुलें जें

अर्जुन क्षत्रियत्व विसरला नव्हता. जगातील राजे महाराजे जिकावें जगाचें राज्य मिळवून आपल्या कुळाचा गौरव वाढवावा आपल्या देशाचें, राष्ट्राचें वैभव इतराना निर्दाळून वाढवावें ही पूर्वजाची प्रथा तो जाणतो परतु जगाला जिंकून ज्याचा गौरव वाढवावयाचा, त्यानाच आज कसें मारायचें? त्या आप्ताना, आपल्याच कुळांतील बधूना कसें मारायचें हा प्रश्न अर्जुनाला पडतो ज्या कुळाच्या मोठेपणासाठीं इतराना जिकायचें त्या माझ्या कुळांतल्याना कसें मारू असें अर्जुन मोठ्या विषण्णतेनें विचारतो.

" ऐसियाते कैसेनि मारू । कवणावरी शस्त्र धरू
निजहृदया करू । घातु केवी "

अर्जुनासमोर युद्ध करावें कीं न करावें असा प्रश्न नाहीं. इतराशीं लढावे, स्वकीयाशीं लढू नये ही गोष्ट अर्जुन जाणतो. या स्वकीयाशीं, गुरुजनाशीं कसें लढू हा त्याचा प्रश्न आहे. मी युद्ध करणार नाहीं, मी रानावनात जातों असें अर्जुन म्हणतो परतु श्रीकृष्णानीं त्याच्या विचारातील चूक दाखवून, त्याच्या प्रश्नातील चूक दाखवून त्याला युद्धप्रवृत्त केले आहे अर्जुन म्हणतो, " मला नको हें राज्य या राज्य सुखाची मला वासना नाहीं माझें राज्य, माझा हिस्सा यांनीं घेतला तरी चालेल " अशा युद्धनिवृत्त अर्जुनाला श्रीकृष्णानीं का प्रवृत्त केलें ? कारण अर्जुनाचा आता तो वैयक्तिक प्रश्न राहिला नव्हता. अर्जुनाच्या पलीकडे जाऊ तेव्हाच त्या प्रश्नाचें उत्तर मिळेल. ज्यावेळेस कौरवाचें व पाडवाचें युद्ध पुकारलें गेलें त्यावेळेस कौरव कौरव म्हणून नव्हते पाडव पाडव म्हणून नव्हते कौरव म्हणजे अन्यायाचे प्रतीक व पाडव म्हणजे न्यायाचें प्रतीक अशी ती परिस्थिति होती एका बाजूस न्याय व एका बाजूस अन्याय असा तो प्रकार होता अर्जुनानें पाडवासाठीं म्हणून लढावयाचें नव्हतें तर न्यायासाठीं त्यानें लढावयाचें होतें ही कर्तव्यनिष्ठा त्यानें सोडणें धर्म्य नव्हतें. जर तो ती गोष्ट टाळू पाहील तर अन्यायाचें पारिपत्य कसें व्हायचें ? अन्यायाचें पारिपत्य झालेंच पाहिजे न्यायासाठीं लढण्याची निष्ठाच जर जगातून नष्ट होईल तर या जगात अन्यायी लोकाचें राज्य होईल. म्हातारी मेल्याचें दु ख नाहीं, परतु काळ सोकावतो मला राज्य नको असें म्हणून प्रश्न सुटत

नाहीं. एखाद्यानें माझ्यावर अन्याय केला तर मी स्वस्थ बसलों समजा परंतु तो उन्मत्त मनुष्य मग दुसऱ्यावर अन्याय करील. तो दुसऱ्याची हिंसा करील. एखादा पिसाळ-लेला कुत्रा आता माझ्यावर आला, मी म्हटलें कीं चावू दे मला. परंतु तेवढ्यानें इतरांचा प्रश्न सुटत नाहीं अन्यायाचें निवारण करण्याचें साधन समाजापुढें सदैव हवें. अन्याय सहन करा असें म्हणणें म्हणजे अन्याय आहे. महात्मा गांधींची ही अशी दृष्टि आहे. ते राजकारणात या दृष्टीनें पडले आहेत स्वतःच्या मोक्षासाठीं व जगाच्या मोक्षासाठीं, अन्याय दूर करण्यासाठीं, लढणें त्याना कर्तव्य वाटतें

वास्तविक स्वराज्याचा लढा हा पोटापाण्याचा आहे घर-दार मिळावें, संततिसंपत्ति लाभावी, संसार सुखाचा व्हावा म्हणून स्वराज्य आहे. स्वराज्याचा लढा हा काहीं आपण सारे मोक्षासाठीं नाहीं फक्त भौतिक कारणासाठीं हा लढा आहे. परंतु महात्माजींच्या नेतृत्वाखालीं चाललेला हा झगडा भौतिक कारणासाठीं असला तरी तो मोक्षाच्या विरुद्ध नाहीं. स्वराज्याचा हा लढा त्यानीं मोक्षाचाहि केला आहे. हा स्वातंत्र्याचा लढा मोक्षाविरुद्ध मार्गानें चालू नये असें त्याचें म्हणणें आहे. त्यांना सांसारिक सुखाची लालसा नाहीं. संतति, संपत्ति इत्यादींचा त्यानीं होम केला आहे. काहीं पाश त्यांनीं ठेविले नाहींत

> " संसारासी आग लावूनियां हातें
> मागुतें परतें पाहूं नये "

असें त्यानीं केलें आहे. संतति संपत्तीचा मोह नसताहि ते या स्वातंत्र्याच्या लढ्यात कां मागील झाले ? लढ्यात

वाचकास विनती.—

## — शुद्धीपत्र —

पृष्ठ न. १६ नंतर १७ ते ३२ पर्यंत चुकीचे आकडे छापताना पडलेले आहेत, ते कृपा करून १७ ते ३२ पर्यंत दुरुस्त करून घेतल्यास मजकुरात कोणत्याही तऱ्हेची विसंगती येणार नाही

क्षणाचीहि त्याना विश्रांति नाहीं. अक्षरशः अहर्निश ते झगडत आहेत. झोंपेत स्वप्न पडलें तरी तें स्वराज्या-संबधींच पडतें. या आताच्या ४२ च्या लढ्याच्या आरंभीं ते म्हणाले, " माझी झोंप नाहींशी झाली आहे. " स्वराज्यार्थ त्याचे जे हे अविरत परिश्रम चालले आहेत, त्यात त्याचा हात धरणारा कोणींहि नाहीं. कोणत्या बुद्धीनें हा निःसंग पुरुष हिंदी स्वातंत्र्याच्या या लढ्यात सामील झाला असावा ? ते म्हणतील, " संतति संपत्तीची अभिलाषा मला नाहीं. मला कशाची आसक्ति नाहीं. कांहीं प्राप्त करून घ्यायचें आहे असेंहि नाहीं. मी आत्मकल्याणार्थ हा झगडा चालविला आहे. " अर्जुन म्हणाला होता " माझें आत्मकल्याण होत नसेल तर त्रैलोक्य राज्य मिळालें तरी तें मला नको आहे. " युद्ध करून आत्मकल्याण साधेल असें जेव्हा श्रीकृष्ण त्याला पटवतात तेव्हाच तो युद्धप्रवृत्त झाला. हें युद्ध कर. आत्म कल्याणाशीं हें विसंगत नाहीं, असें भगवतांनी त्याला सांगितलें गीतेंत हें वैशिष्टय आहे. अर्जुनाच्या भूमिकेचें हें वैशिष्टय आहे. पूर्वपक्षी आत्मकल्याणाची दृष्टि घेणारा असें धार्मिक ग्रंथात बहुधा आढळणार नाहीं. पूर्वपक्षी नेहमीं सांसारिक दृष्टीचे असतात. आणि गुरु त्याला आत्मकल्याणा-

कडे आणीत असतो. सामान्य मनुष्य नेहमीं असें विचारतो कीं, "आम्ही भौतिक सुखाच्या मार्गे कां लागू नये!" आणि गुरु सांगत असतो, "हे भौतिक सुखभोग सोड." जगातील धार्मिक ग्रंथ पाहिले तर अशा प्रकारचे धार्मिक व नीतीचे संवाद सापडतात. परंतु भगवद्गीतेंतील पूर्वपक्षी निवृत्तकाम होऊं पाहणारा, विरक्त असा आहे. आत्मकल्याणाची भाषा वापरणारा आहे. आत्मकल्याण श्रेष्ठ असें त्याला सांगण्याची जरूरीच नाहीं त्याला एवढेंच पटवून द्यायचें आहे कीं जें युद्ध तू टाळू पहात आहेस, तें युद्ध आत्मकल्याणास बाधा आणणार नाहीं. न्यायासाठीं अनासक्तबुद्धीनें तें युद्ध तू कर.

श्रीकृष्ण त्याप्रमाणें अर्जुनाला म्हणाले, "हा लढा टाळू पाहशील तर आत्मकल्याण गमावशील. आत्मकल्याणास विरुद्ध असें मी तरी कसें सांगेन? आत्मकल्याणासाठींच लढा कर–" त्याप्रमाणें महात्मा गांधींहि आत्मकल्याणार्थ हा लढा लढत आहेत. आत्मकल्याणाची दृष्टि असलेला हा महात्मा पुढें होऊन राजकारण आज करीत आहे. समाजात अशा पुरुषाची एक निराळीच कोटि असते. ही सामान्य माणसाची कोटि नव्हे

श्रीकृष्ण, जनक, वगैरे मोक्षार्थींनीं निर्मम बुद्धीनें युद्धें केलीं. परंतु महात्माजींनी सुरू केलेलें सत्याग्रही युद्ध, त्यांनी आरंभिलेली ही क्रान्ति राजकारणात अपूर्व आहे राजकारणांत महात्माजींनीं दिव्य आध्यात्मिकता आज आणली आहे. ही पुढची पायरी आहे हें नवीन दर्शन आहे. अध्यात्मांतील हा नवीन अनुभव आहे. महात्माजी जरी

भगवद्गीतेंत अहिंसा मानीत असले तरी अहिंसेसाठीं तिचा अवतार आहे असें तेहि मानीत नाहींत. अनासक्त रीतीनें युद्ध करावें असें गीता सांगते. त्या साठीं एक भौतिक युद्ध भगवद्गीता दृष्टांतासाठीं घेते. अनासक्त रीतीनें कोणताहि व्यवहार करावा लागला तरी तें पाप नाहीं असें गीता सांगते आणि अर्जुनास युद्धार्थ प्रवृत्त करिते.

परंतु आज युद्धाचा व्यवहार निराळ्या रीतीनें करण्याची वेळ आली आहे. महात्माजीहि 'मी युद्ध करतों, मी बंड पुकारतों' असेच शब्द वापरतात. 'मी क्रान्ति करतों, झगडा करतों' असें ते म्हणतात. महात्माजींनीं युद्धाचा अर्थ व्यापक केला आहे. त्याचे हे शब्द वाच्यार्थानें घेऊन पुष्कळजण त्यांच्याविषयीं गैरसमज फैलावित असतात. "अत्याचाराची कॉंग्रेसवरील जबाबदारी" या सरकारी चोपड्यात महात्माजींच्या शब्दांचा असाच दुरुपयोग करण्यांत आलेला आहे. महात्माजी युद्ध, बंड, वगैरे जुनेच शब्द वापरतात. परंतु त्यांत ते नवीन अर्थ ओतीत असतात. त्यांचा भावार्थ निराळा असतो. सरकारनें महात्माजींच्या शब्दांचा विपर्यास केला आहे. महात्माजींच्या मनांतील जो अर्थ तो मुद्दाम दडपून टाकला आहे. मी शब्दांचे अर्थ बदलणार आहे असें त्यांनीं स्पष्टपणें अनेकदा सांगितलें आहे. शब्दांचा नवीन अर्थ करायला मी भगवद्गीतेपासूनच शिकलों असें ते म्हणतात. यज्ञ या शब्दाचा अर्थ भगवद्गीतेनें बदलला आहे. ज्ञानयज्ञाची भव्य कल्पना गीतेनें दिली आहे. यज्ञशब्दांतील अर्थाचा भगवद्गीतेनें विस्तार केला आहे. आत्मा, ज्ञानप्राप्ति, मोक्ष, वगैरे शब्द पूर्वीचेच रूढ

झालेले, परतु त्या रूढ शब्दात नवीन अर्थ ओतता येतो. महात्माजी म्हणतात, " मीहि युद्ध करीत आहें. आपणावर अन्याय होत असेल तर त्याच्या निवारणार्थ युद्ध केलेंच पाहिजे." परतु हें युद्ध म्हणजे शस्त्रास्त्रांचेंच, हिंसेचेंच असेल किंवा असलें पाहिजे असे नाहीं. युद्ध या शब्दातील मुख्य भावना कोणती ? प्रतिकार करावा, हक्कांचें सरक्षण करावें, ही भावना आहे. प्रतिकार करण्याचा दुसरा एखादा नवीन प्रकार मी शोधून काढला तर तें युद्धच आहे. आणि हा प्रतिकाराचा मार्ग अमान्य होण्याचें कारण नाहीं. भगवंतानीं यज्ञाचा अर्थ बदलला. महात्माजी *म्हणतात मी युद्धाचा अर्थ बदलतों. हिंसात्मक युद्धानें जी* गोष्ट आपण साधू पाहतों त्यापेक्षा माझ्या अहिंसात्मक युद्धानें ती अधिकच साध्य होईल. जी गोष्ट युद्धाच्या साधनानें आपण मिळवूं पाहतों, ती वास्तविक आपणास मिळतच नसते. तात्पुरता विजय वाटला, ध्येय मिळालें असें वाटलें, तरी मागून भ्रमाचा निरास होतो अहिंसेनेंच खरें स्वराज्य मिळेल असें महात्माजी मानतात. अहिंसेनेंच असें ते का म्हणतात ? स्वराज्य हें आपलें साध्य आहे अहिंसा हेंच साधन का ? हिंसेचें साधन का वापरू नये ? हिंसेचें साधन वापरून मिळणारें स्वराज्य मला नको असें ते का म्हणतात ? श्रेष्ठ साध्यासाठीं हीन साधन असलें तरी चालेल असें आपण आजपर्यंत शिकत आलों. महात्मा गांधींनीं हा सिद्धात खोटा ठरविला आहे. हीन साधनाचा अवलंब करून श्रेष्ठ साध्याची प्राप्ति होऊच शकत नाहीं. साध्यप्राप्तीचे नाना मार्ग आहेत. निवरणी करून, कोर्टकचेरीचा अवलंब करून, धाडा

मारून, अशा अनेक मार्गांनीं आपण आपलें गेलेलें घरदार, हिरावून घेतलेले हक्क, याना परत मिळवू पाहतों परंतु विनवणीनें मिळालेलें घर, कोर्टकचेरीच्या द्वारा मिळालेलें घर, थपडा मारून मिळालेलें घर, हीं तिन्हीं घरें एकरूप नाहींत. जें घर विनवणीनें मिळालें, त्यापेक्षां कोर्टाच्या मार्गानें मिळालें तें घर निराळें आहे, थपडा मारून मिळालेलें घर, आत्मक्लेशाच्या मार्गानें मिळणाऱ्या घराहून वेगळें आहे महात्माजी म्हणतात "मी जें घर मिळवणार आहें तें तुमच्या घराहून निराळें आहे मी जें स्वराज्य आणून देणार आहें ते तुमच्या स्वराज्याहून निराळें आहे." ज्या प्रकारचें साधन असेल त्या प्रकारचें साध्य शेवटीं पदरात पडते. साधनाची परिणति म्हणजेच साध्य. साधनाचे गुणदोष साध्यात येतात म्हणून निर्दोष साधनें वापरावीं म्हणजे निर्दोष ध्येय पदरात पडेल महात्माजी खडकावर बांधलेलें भक्कम घर मिळवू पहात आहेत. वाळूवरचें, कोलमडणारें, क्षणभंगुर, घर काय कामाचें ?

साध्यासाठीं साधनेंहि शुद्ध व उच्च वापरा, अशी उच्च दृष्टि महात्माजींनीं दिली आहे.

---

## प्रवचन २ रें

महात्मा गांधी हे धर्मपुरुष आहेत त्यांची मूळची प्रेरणा धर्माची आहे. मोक्षप्राप्तीसाठीं त्यांचें सारें जीवन राजकारण, अर्थकारण, समाजकारण, धर्मकारण या सर्वांत ते अहोरात्र भाग घेत आहेत. परंतु त्यांच्या या सर्व उद्योगांच्या मुळाशीं मोक्षप्राप्तीची तळमळ आहे. मागें स्वराज्याचा चौरस म्हणून जो सांगितला त्यावर त्यांनीं एक सुंदर लेख लिहिला होता. त्या लेखांत ते स्पष्टपणें लिहितात कीं मोक्षासाठीं, संपूर्ण सत्यदर्शनासाठीं मी अधीर झालों आहें महात्मा गांधींना राजकारण व धर्मकारण ह्या दोन संपूर्ण भिन्न अशा वस्तु वाटत नाहींत. धर्मासाठींच त्यांचें राजकारण आहे ते मोक्षासाठीं तळमळत आहेत. धर्म हा त्यांना प्राणासमान वाटतो म्हणूनच ते राजकारणांत आले. राजकारणांत आल्याशिवाय सत्याकडे पूर्णपणें जाता येणें शक्य नाहीं असें त्यांना निःशंकपणें दिसून

आलें आणि म्हणून ते राजकारणाच्या रंगणात आले. धर्मासाठीं राजकारण, सत्याच्या संपूर्ण दर्शनासाठीं राजकारण, हा महात्माजींच्या दृष्टिकोणाचा विशेष बिंदु आहे. ज्याला मोक्षप्राप्ति करून घ्यावयाची आहे त्याला राजकारणापासून अलिप्त राहता येणार नाहीं असें ते म्हणतात. आणि मोक्षप्राप्ति म्हणजे तरी काय ? मोक्षप्राप्ति म्हणजे ' संपूर्ण सत्याचें दर्शन ' असें ते म्हणतात. सत्याचें हें दर्शन प्रेम व अहिंसा याच्या द्वारा होऊं शकतें अशी त्यांची श्रद्धा आहे. या सत्यदर्शनाच्या ध्येयप्राप्तीसाठीं महात्माजींना राजकारणात भाग घेणें का अवश्य वाटलें याचा आपण विचार केला पाहिजे एखाद्या मोक्षार्थीला, सत्यदर्शनार्थ तहानलेल्याला त्यासाठीं राजकारणात पडण्याची अपरिहार्य आवश्यकता वाटली असें उदाहरण इतिहासात नाहीं. महात्माजींना असें दिसून आलें की प्रत्येकाच्या जीवनात राजकारण हें घुसलेलें आहे. समुद्रात ज्याप्रमाणें भूशिर शिरलेलें असतें त्याप्रमाणें हें राजकारण आपल्या जीवनात घुसलेलें आहे. राजकारण म्हणजे सत्ताधाऱ्यांचें वर्तन एवढ्या संकुचित अर्थानें ते त्याच्याकडे बघत नाहींत. सत्ताधाऱ्याच्या पापपुण्यात प्रत्येक प्रजाजन भागीदार होत असतो. न्याय व अन्याय यासाठीं प्रत्येक व्यक्ति जबाबदार आहे. जोंपर्यंत राज्यसंस्था न्यायानें वागत आहे तोंपर्यंत तिच्याशीं सहकार करणें धर्म्य आहे. परंतु जर राज्यसंस्था अन्याय करीत असेल तर तिच्याशीं असहकार करणें हेंहि सत्यार्थी मनुष्याचें कर्तव्य आहे सहकार व असहकार हीं दोन्ही आपलीं कर्तव्यें ठरतात. आपण हरघडी सरकारला पाठिंबा देत असतों. सर-

कारला कर देऊन, सरकारचे कायदे पाळून, सरकारची नोकरी करून आपण पाठिंबा देत असतो. ज्याना काहीं कर द्यावा लागत नाहीं, अशानाहि स्वसंरक्षणासाठीं राज्यसंस्थेवर अवलंबून राहावें लागतें म्हणून आपण राज्यकर्त्यांना त्याच्या सर्व व्यवहारात उचलून धरतों त्याना आपण साथ देतों, त्याच्याशीं सहकार्य करतों, मदत करतों आपण सरकारला साहाय्य करतों, सरकारचें साहाय्य आपण घेतों असा हा अन्योन्य संबंध आहे प्रत्येक नागरिकाच्या जीवनात या प्रमाणें राजकारणाचा कमी अधिक अंश आहे. महात्माजी राजकारण अशा व्यापक अर्थानें घेतात. राजकारणाचे धागे दोरे आपल्या जीवनात विणले जात असतात. त्यापासून दूर राहता येणार नाहीं राज्यसत्तेला साहाय्य देण्याचा प्रश्न जेथें जेथें येतो तेथें तेथें राजकारण येतेंच राजकारण म्हणजे सरकारी नोकरी करणें व नेतृत्व करणें एवढाच नाहीं. राजकारणात पडायचें म्हणजे 'पुढारी होण्यासाठीं' असा अर्थ ते करीत नाहींत. त्याना ज्याला म्हणून पापापासून मुक्त व्हावयाचें आहे त्यानें अन्यायी राज्यसंस्थेशीं असहकार केला पाहिजे. नाहीं तर त्या राज्यसत्तेच्या पापात तो भागीदार होईल. मी अन्यायी राज्यात असेन व मी जर मोक्षार्थी असेन तर त्या राज्यातील कायद्याचा भंग करणें माझा धर्म होतो. असहकार, कायदेभंग, या गोष्टींचा मला स्वीकार करावाच लागतो. मीच असहकार करावा एवढेंच नाहीं, सर्व जनते-सहि मीं बरोबर घेतलें पाहिजे. जनतेची नैतिक उन्नति व्हावयास हवी असेल तर तिलाहि अन्यायी राज्यसत्तेशीं असहकार करण्यास मी उद्युक्त केलें पाहिजे जितक्या

लौकर अन्याय दूर होईल तितक्या लौकर माझा सत्य-दर्शनाचा मार्ग मोकळा होईल अन्याय लौकर दूर होण्यासाठीं जास्तींत जास्त अधिक जनता उभी करणें हें कर्तव्यच ठरतें. महात्मा गांधींची राजकारणाकडे बघण्याची ही अशी दृष्टि आहे. राजकीय प्रश्न हा सर्वंकष आहे. सर्वांच्या जीवनाला अनेक बाजूनीं स्पर्श करणारा हा प्रश्न आहे. हा प्रश्न सोडून देता येणार नाहीं राजकारण म्हणजे केवळ राजधर्म नाहीं राजकारणात राजाचा धर्म येतो तसाच प्रजेचाहि धर्म येतो. राजधर्मापेक्षा राजकारणाची व्याप्ति अधिक आहे. प्रजाधर्मांत इतर व्यवहार येतात तसच राजकीय व्यवहारहि येतो. लोकाना आपण सांगितलें पाहिजे कीं या मार्गानें जा. असहकार करा. महात्माजींना म्हणून राजकारणाचा प्रश्न आपल्या मोक्षमार्गांत समाविष्ट करावा लागला. दुसरीहि एक गोष्ट त्याना दिसून आली की राजकीय प्रश्नाप्रमाणेंच आर्थिक प्रश्नही जीवनात महत्त्वाचा आहे समाजाची आर्थिक घडी नीट नसेल, सर्वत्र अन्नान्नदशा असेल तर मोक्षार्थी माणसाचें मोक्षाकडे लक्ष कसें लागेल ! जोंपर्यंत सर्वांना पोटभर अन्न देता येत नाहीं, तोंपर्यंत देवाचें नाव मी त्याना कोणत्या तोंडानें सांगावें ! सपूर्ण मानवी जीवनाचा पाया जोंपर्यंत सुदृढ नाहीं तोंपर्यंत मानवाला आत्मोन्नतीची आशा नाहीं. राजकारणातील अन्याय दूर करण्यासाठीं ज्याप्रमाणें मोक्षार्थी पुरुषानें उठलें पाहिजे त्याचप्रमाणें सामाजिक विषमता, आर्थिक विषमता दूर करावयासहि त्यानें उभें राहिलें पाहिजे. मनुष्याची जगण्याची इच्छा फार प्रबळ असते. ही जी अदम्य जीव-

नाशा, तिच्यातूनच धनाशा जन्मते. धनाशा जीवनाचाच एक भाग आहे. जगामध्यें जीं अनत पापें होत असतात, ज्या मारामाऱ्या, ज्या लढाया होत असतात, ज्या स्पर्धा चाललेल्या असतात, त्या सर्वांच्या मुळाशीं जीवनाची आशा आहे अहिंसा-पालनास आपण ज्या मर्यादा घालू लागतों त्याचें कारणहि ही जीवनाशा आहे आपणास या जगात वागताना असें दिसून येतें कीं जगण्यासाठीं आपणास अनेकाना त्रास द्यावा लागतो; हिंसा करावी लागते दुसऱ्यास त्रास न देता कसें जगावें हा प्रश्न जोंपर्यंत सुटणार नाहीं तोंपर्यंत अहिंसेचें नीट पालन करणें शक्य होणार नाहीं. समाजातील आर्थिक व्यवहार ज्या मानानें अहिंसक होऊं लागतील त्या मानानें आत्मप्राप्ति करून घेणें शक्य होत जाईल आत्मप्राप्ति अहिंसेशिवाय होऊंच शकत नाहीं म्हणून महात्माजींना आर्थिक क्षेत्रात पडावें लागलें आर्थिक क्षेत्रात अहिंसा कशी आणावी याचा ते विचार करू लागले मी आर्थिक रचनेला जर अहिंसक पाया न देईन तर मला संपूर्ण सत्याचें दर्शन होणें अशक्य आहे, असें महात्माजींस वाटलें कारण सत्यदर्शन अहिंसेच्याच प्रकाशात होऊं शकते. राजकारणात अहिंसा, आर्थिक व्यवहारात अहिंसा, त्याचप्रमाणें सामाजिक व्यवहारातहि अहिंसा आणायला हवी. अहिंसेचें नैतिक व सामाजिक असें द्विविध स्वरूप आहे समाज नीट राहावा यासाठीं समाजातील संबंध सलोख्याचे हवेत. गुण्यागोविंदाचे हवेत. सामाजिक संबंध प्रेमाचे, अहिंसेचे नसतील, ते विषमय असतील, विषमतेनें भरलेले असतील, तर समाजात राहणें अशक्य होईल तेथें हिंसेचें थैमानच राहील. राजकारणा

पेक्षाहि सामाजिक व्यवहार अधिक व्यापक असतात. राज-सत्तेला जनतेचा सहकार लागतो, त्यापेक्षाहि समाज नीट चालावा म्हणून अधिकच अन्योन्य सहकार हवा सामाजांत अन्योन्य सहकार नसेल तर सारें जीवनच अडेल. समाजामध्यें सहकार नसेल तर कांहींच चालणार नाहीं. समाजाचा परिणाम आपल्यावर फार होत असतो समाजात जीं ध्येयें असतात, जे विचार असतात, ज्या रूढी असतात, त्या सर्वांचा आपल्या विचारसृष्टीवर परिणाम होत असतो. आपल्या मनावर या सर्व गोष्टींचे संस्कार होत असतात आपलें मन समाजरचनेशीं जणू एकरूप असतें आपलें जीवन सभोंवतींच्या सामाजिक घटनेपासून अलग होऊ शकत नाहीं सामाजिक सुधारणा झाल्याशिवाय, समाजाची नीति सुधारल्याशिवाय मी तरी संपूर्ण सत्याचें दर्शन कसें घेऊं शकेन ? समाजाच्या दोषात मीहि भागीदार आहें समाजाचे स्थूल व सूक्ष्म परिणाम माझ्याहि जीवनावर होत असतात म्हणून माझा मोक्ष समाजाच्या सुस्थितीवर अवलंबून आहे ज्या मानानें राजकीय गोष्टी, आर्थिक गोष्टी, सामाजिक गोष्टी सुधारतील, ज्या मानानें ह्या त्रिविध क्षेत्रातील हवा शुद्ध होईल, ज्या मानानें या तिन्ही क्षेत्रात प्रकाश येईल, समता व न्याय येईल, अहिंसा व प्रेम येईल, त्या मानानें सत्याचा संपूर्ण साक्षात्कार होणें शक्य होईल. ज्या समाजात हें सारें असेल, ज्या राज्यव्यवस्थेंत हें सारें असेल, त्यालाच महात्माजी रामराज्य म्हणतात स्वराज्य-खरें स्वराज्य-तें हें. हेंच सत्ययुग. महात्माजींचें रामराज्य म्हणजे ज्या अर्थानें लोकशाही आपण समजतों तीं नाहीं आजची लोकशाही, आजचा नाझीझम,

वा आजचा समाजवाद, या गोष्टी महात्माजींच्या रामराज्यांत नाहींत. या राजकीय तत्त्वज्ञानांतील चांगल्या गोष्टी महात्माजी घेतील. परंतु यांतील कोणतीहि राज्यपद्धती सर्वस्वी त्यांना मान्य नाहीं. त्यांना सत्ययुगाकडे जायचें आहे. ज्या सत्ययुगाकडे त्यांना जायचें आहे, त्याची कल्पना त्यांनीं मांडिली आहे. राजकारण, अर्थकारण, समाजकारण, शुद्ध करीत धर्माच्या शिखराकडे आपणास जावयाचें आहे. धर्म हें खरा ज्याचें शिखर आहे परंतु हा धर्म कोणता? उद्यांच्या तुमच्या स्वराज्यांत, रामराज्यांत कोणता धर्म राहणार? या प्रश्नाचें नीट उत्तर देऊन ठेवलें पाहिजे नाहींतर फार घोंटाळा होईल विशेषत. या हिंदुस्थानांत जेथें नाना धर्मांचे व पंथांचे लोक आहेत तेथें तर फारच घोंटाळे माजतील म्हणून धर्म या शब्दाची फोड केली पाहिजे. महात्माजींनीं तशी फोड केली आहे. ते म्हणतात " स्वराज्यांत जो धर्म राहील, रामराज्यांत जो धर्म राहील, त्या धर्मांत ज्याला परमोच्च धर्म आपण समजतों तोच फक्त राहील. त्या परमोच्च धर्माच्या पोटांत सारे धर्म येतात. सर्व धर्मांतील उच्च तेवढेंच त्या धर्मांत येईल. त्यामुळें आपापल्या वैयक्तिक धर्मापेक्षांहि प्रत्येक धर्मांतील सदंश ( चांगला भाग ) घेऊन बनणारा जो परम धर्म तो श्रेष्ठ होईल. वाटलें तर त्याला सत्यधर्म असें नाव द्या. परम सत्याचा धर्म व्यवहारांतील सत्य नव्हे. सोयीसाठीं वापरलें जाणारें तात्पुरतें सत्य, त्याचा हा धर्म नव्हे तर शाश्वत सत्याचा धर्म. अहिंसेंतील नैतिक तत्त्वानें आपण धर्म उदात्त व शाश्वत सत्याचा करूं. अहिंसेतील सामाजिक तत्त्वानें समाजांतील सत्य प्रेमाचें करूं. राजकारणांत व अर्थकार-

णातहि अहिंसा नेऊन तेथेंहि न्यायाची म्हणजेच सत्याची स्थापना करू. अशाप्रकारें स्वराज्याच्या चौरसाचे जे चार कोन, ते चारी अहिंसामय होतील, तेव्हाच तरणोपाय आहे. चौरसाचे सारे कोन सारखे हवेत प्रत्येक कोन ९० अंशाचा हवा. एक कोन बिघडला तरी चौरस सदोष होईल. तो चौरसच होणार नाहीं. त्याप्रमाणें राजकारण, अर्थकारण, समाजकारण व धर्मकारण या चारी क्षेत्रात अहिंसा भरून राहील तरच सर्वत्र सत्याचें दर्शन होऊं लागेल. तरच पूर्णत्वाचा शोध करायला वाव मिळेल तरच त्या परमोच्च निकासाकडे, नैतिक नि आध्यात्मिक श्रेष्ठतेकडे आपणास जाता येईल.

महात्माजींना जें स्वराज्य आणावयाचें आहे ते इंग्रजी पार्लमेंटरी पद्धतीच्या लोकशाहीचें किंवा नाझीझमचें, फॅसिझमचें किंवा सोशॅलिझमचें केवळ अनुकरण नाहीं. महात्माजी म्हणतात : " त्या त्या देशानीं स्वतःच्या वृत्तीला व परंपरेला अनुरूप अशा राज्यव्यवस्था निर्माण केल्या. आपण भारतीय परंपरा व वृत्ति यांना अनुकूल अशी राज्यपद्धती निर्मू. इतर देशातील राज्यपद्धतींहून आमची राज्यपद्धती भिन्न असेल. आमच्या प्रकृतीस व प्रवृत्तीस मानवणारी अशी ती असेल." ती जी आमची शासनपद्धती आदर्श व परंपरानुरूप अशी शासनपद्धती-निर्माण होईल, तिलाच महात्माजी ' रामराज्य ' असें नाव देतात. अत्यंत प्राचीन अशा या शब्दात महात्माजींनीं अत्यंत आधुनिक असा अर्थ योजला आहे. ते म्हणतात : " माझ्या रामराज्यात लोकशाही असेल, लोकसत्ता असेल. परंतु ती लोकसत्ता

केवळ नैतिक आधारावर उभारलेली असेल." (Sovereignty of the people based on pure moral authority) नुसती लोकसत्ता नव्हे तर नीतीच्या पायावर आधारलेली लोकसत्ता. महात्माजी प्रत्येक शब्दात स्वत चा अर्थ ओतीत असतात रूढ असलेले शब्दच ते घेतात परंतु त्यात नवीन अर्थ ओततात. लोकशाही हा शब्द ते घेतील, परंतु त्या लोकशाहीला ते नैतिक आधारावर उभारतील केवळ लोकसत्ता श्रेष्ठ नाही. नैतिक पायावरची लोकशाही हवी. लोकशाहीत ज्याप्रमाणे ते नैतिक आधार आणतात, या राजकीय कल्पनेला नीतीवर उभारतात, त्याप्रमाणें आर्थिक क्षेत्रातहि ते करतात. लोकशाहीत अहिंसा हवी असेल तर तेथें नीति हवी. त्याप्रमाणें अर्थशास्त्रात अहिंसा आणायची असेल तर काय करायला हवें ! आर्थिक उन्नति म्हणजे महात्माजी औद्योगीकरण समजत नाहीत. मोठमोठे कारखाने काढणें, गिरण्या काढणें, देशात किती संपत्ति उत्पन्न होते तिची मोजदाद करणें, म्हणजे आर्थिक उन्नति नाही महात्माजींची ही दृष्टि नाही. आर्थिक स्वातंत्र्याचा ते असा अर्थ करतात की 'प्रत्येकाची आर्थिक उन्नति होणें.' देशात सरासरी उत्पन्न किती पडतें यावर त्याचा विश्वास नाही. खरोखर प्रत्येकाच्या खिशात प्रत्यक्ष काय पडतें हा महत्त्वाचा प्रश्न आहे. प्रत्येक व्यक्तीला, स्त्रीला, पुरुषाला स्वत-च्या प्रयत्नांनीं स्वतःची आर्थिक उन्नति करून घेण्याची संधि हवी. महात्माजींच्या स्वराज्यांत प्रत्येकाला पुरेसें अन्न मिळेल. अंगभर भरपूर वस्त्र मिळेल. दूध तूप मिळेल रूझवेल्ट व चर्चिल यानीं जी 'अटलांटिक सनद' जाहीर केली होती तींत त्यांनीं अशी घोषणा केली

होती कीं, "चार प्रकारच्या उणीवा आम्हीं नाहींशा करणार आहोंत. चार प्रकारचें स्वातंत्र्य आम्ही देणार आहोंत." १ गरजेपासून मुक्ति, २ भीतिपासून मुक्ति, ३ धार्मिक स्वातंत्र्य, ४ वाचिक स्वातंत्र्य. [ Freedom from want, 2 Freedom from fear; 3 Freedom of Religion, 4 Freedom of speech, हीं चार स्वातंत्र्यें त्यांनीं उद्घोषिलीं होतीं. ] चर्चिल व रूझवेल्ट प्रत्यक्ष देवोत वा न देवोत. वाक्स्वातंत्र्य वगैरे येथें कितपत आहे, हिंदुस्थानांत सर्वच गोष्टींची टंचाई व अन्नान्न दशा कशी आहे, जिकडे तिकडे भीतीचें राज्य कसें आहे, तें हिंदी जनतेच्या पदोपदीं अनुभवास येतच आहे. येथें दहशतवाद निर्मून चर्चिलनें आम्हांस भीतिपासून मुक्तता दिली आहे ! अन्नान्नदशा निर्मून गरजेपासून मुक्ति दिली आहे ! तें आजचें कांहीं असो. जें रामराज्य आपणांस निर्मावयाचें आहे तेथें प्रत्येकास भरपूर अन्नवस्त्र असेल. रहायला घर असेल. विश्रांति असेल. ज्या समाजांत जीवनाची शाश्वती नाहीं त्या समाजांत काय राम ? त्या समाजांतील स्वातंत्र्याला काय अर्थ ? त्या रामराज्यांत अहिंसेनें सत्य बोलण्याचें स्वातंत्र्य पाहिजे. त्या रामराज्यांत अन्नान्नदशा असतां कामा नये. नुसती कोरडी भाकरच नव्हे तर महात्माजी दूध लोणी प्रत्येकास मिळालीं पाहिजेत असें म्हणतात. कारण त्या आवश्यक वस्तु आहेत. आजच्या राजवटींत दूध तूप शब्दच उरले. दूध म्हणजे काय असा प्रश्न विचारण्याची आज पाळी आली आहे. रामराज्यांत जर असें हें चित्र निर्मावयाचें असेल तर तें कशानें साधेल ? सर्वांची आर्थिक ददात मिटावी म्हणून काय करावें लागेल ? आर्थिक

प्रश्न सुटण्यासाठीं समाजरचनेचा प्रश्नहि हातीं घ्यावा लागेल. सामाजिक रचना रामराज्यांत कशी असावी ? महात्माजी लिहितात, " सर्व जमीन परमेश्वराची आहे. मानवानें तुकडे केले. सीमा, चतुःसीमा घालून बलवंतानीं जमीनीचे भाग बळकावले." महात्माजींनीं जमीन गोपाळाची असे शब्द वापरले आहेत. गोपाळ म्हणजे परमेश्वर, गोपाळ म्हणजे शेतकरी. दोन्ही अर्थ आहेत. ही जमीन ईश्वराची आहे. आणि जो कसतो, मशागत करतो, श्रमतो, त्याची आहे. जमीन परकीयसत्तेची नाहीं. मूठभर जमीनदाराची नाहीं ती जमीन श्रमणाऱ्याची आहे. परंतु आज काय दिसतें ? ती जमीन आज जनतेच्या हातीं नाहीं. का नाहीं ? आपण धर्माप्रमाणें वागलों नाहीं म्हणून. तर मग हें काम कसें करायचें ? रशियानें हें कार्य केलें आहे. परंतु महात्माजी म्हणतात त्याहिपेक्षा चांगल्या रीतीनें आपण ही गोष्ट करूं. कारण आपण सारें अहिंसेनें करणार आपण जर चरका घेऊं, त्यातील सर्व अर्थ लक्षांत घेऊं तर हें होईल केवळ जमीनच नव्हे तर सारीच संपत्ति जो श्रम करतो, त्याची आहे. परंतु आज काम करणारे, श्रमणारे संपत्तीपासून दूर आहेत. ज्या कारखान्यांत ते काम करतात, ज्या शेतींत ते राबतात, ती सारी उत्पादन साधनें वास्तविक त्यांचीं आहेत. जो श्रम करतो त्याची जमीन, त्याला मालमत्ता, असें तत्त्व उद्यां रामराज्यांत घालावें लागेल. मानावें लागेल. फक्त हें सारें अहिंसेनें करावयाचें अहिंसेनें करावयाचे चारी कोपरे उभारावयाचे. अर्थकारण, राजकारण, समाजकारण व धर्मकारण या सर्वांत अहिंसा खेळवाव-याची. असें रामराज्य पुन्हा एकदां देशांत करून मागणार

नाहीं सर्वच देशात या प्रकारे अहिंसक क्रांति झाली पाहिजे. असें होईल तरच जगातून युद्धे नष्ट होतील. कारण युद्धाचा आधारच जाईल.

जें स्वराज्य आपणास आणावयाचें आहे, जी लोकसत्ता उद्या निर्मायची आहे; ती आत्म्याच्या नैतिक शक्तीवर आरूढ असलेली अशी व्हावी. जो ईश्वर, जो परमात्मा आपल्या हृदयात आहे, त्याला स्मरून जनतेनें मतें द्यावींत. आत्म्याला स्मरून दिलेल्या मतावर आधारलेली लोकसत्ता, ती खरी लोकसत्ता होईल. केवळ हात वर करणें व मोजणें म्हणजे लोकशाही, असें महात्माजींस वाटत नाहीं. बहुमतानें दिलेला निर्णय सर्वांनीं मान्य केलाच पाहिजे अशा मताचे ते नाहींत. महात्माजींनीं लोकमान्यांविषयीं लिहिताना एकदा म्हटलें आहे, " लोकमान्य लोकशाहीचे पक्के पुरस्कर्ते होते. बहुमत वाल्यांच्या सत्तेवर त्यांचा विश्वास होता. परंतु बहुमतवाल्यांच्या सत्तेवर त्यांची असलेली अपरंपार श्रद्धा पाहून मला कधीं कधीं भीति वाटे." महात्मा गांधींना बहुमताचा तितकासा भर वसा वाटत नाहीं. म्हणजे का त्याना अल्पमतवाल्यांच्या हातीं सत्ता असणें पसंत आहे? तसेंहि नाहीं. लोकांचीच सत्ता असू दे. बहुमताची सत्ता असू दे. परंतु त्या बहुमताच्या पाठीमागें आत्मिक बुद्धि असू दे. नैतिक बळावर आधारलेलें असें तें बहुमत असू दे. लोकशाहीमध्यें नैतिक प्राण असावा यासाठीं लोकात उच्च व उदात्त नीतीची सतत जागृति ठेवणारे लोक हवेत. लोकांच्या नैतिक भावना जागृत ठेवतील, त्यांच्या भावना बुजून जाऊं देणार नाहींत, असें करणारे लोक हवेत. नैतिक निर्भयतेनें आपलीं मतें वोढून

दाखविणारे लोक हवेत लोकसत्तेला नीतीचा आधार हवा. मॅझिनी एकदा म्हणाला, "खरी शेवटची अंतिम सत्ता कोणाची ?" "Where does sovereignty lie ? It lies in God" "अंतिम सत्ता परमेश्वराच्या हातीं" मॅझिनीच्या म्हणण्याचा हाच भावार्थ आहे कीं, खरी सत्ता नीतीची आहे नैतिक कायदा हा सर्वश्रेष्ठ कायदा माझ्या नैतिक प्रेरणेला मी सर्वश्रेष्ठ मानीन मग मला बहुमत असो वा नसो सत्याग्रही तत्त्वज्ञानात ही भावना आहे लोकसत्तेलाहि, बहुमताच्या सत्तेवरहि येथें नीतीची सार्वभौम मर्यादा घात लेली आहे तुम्ही दुसऱ्याच्या आत्म्याला दडपून टाकाल तर त्या स्वराज्यास काय अर्थ ? स्वराज्यात कोणी कोणाचा गुलाम नको जो गुलाम असतो, आर्थिक दृष्ट्या दुसऱ्याचा मिंधा असतो, तो स्वतन्त्रपणें आत्म्याला स्मरून थोडेंच मत देणार ? गुलामाला आत्मा नाहीं रामराज्यात, खऱ्या लोकशाहींत सर्वांना सामाजिक स्वातंत्र्य असेल, आर्थिक स्वातंत्र्य असेल, राजकारणात स्वतःचें मत त्यांना बोलून दाखविता येईल तेथील लोकमतहि नीतीचा सर्वभूतहिताचा कायदा पाळील असें होईल तरच खरा थोर सत्य धर्म तेथें आला असें म्हणता येईल

लोकशाहींत लोक तेव्हाच आत्म्याला स्मरून मतें देतील जेव्हां आर्थिक दृष्ट्या ते स्वावलंबी असतील अन्नाचा प्रश्न आधीं सुटला पाहिजे अन्नच नाहीं तर धार्मिक उन्नति, नैतिक उन्नति कशी होणार ? मनुष्याच्या आवश्यक आर्थिक गरजा भागवल्या गेल्या पाहिजेत त्याखेरीज त्याची नैतिक वाढ होणार नाहीं समाजवादी लोक या गोष्टीवर फार भर देतात

आधीं पोटोबा मग विठोबा असें आपण म्हणतों, त्यांत हाच अर्थ आहे. महात्मा गांधीहि ही गोष्ट मानतात. परंतु जरा निराळ्या दृष्टीनें ते त्या गोष्टीकडे पाहातात नैतिक उन्नतीसाठीं आर्थिक सुस्थिति हवी ही गोष्ट खरी आहे. परंतु या गोष्टीलाहि काहीं मर्यादा आहे. आर्थिक सुस्थितीनें नैतिक उन्नति होते हें सर्वांशीं खरें नसून काहीं अशीं खरें आहे मनुष्याची भूक भागल्यावरच त्याची जीवधारणा होईल, तेव्हाच नैतिक उन्नतीची शक्यता असते परंतु तुम्हीं जर असें म्हणाल कीं, इतके सुखोपभोग मिळाले कीं दुसऱ्या बाजूस इतकी नैतिक उन्नति होतेच तर तें खरें नाहीं. त्याला काहीं मर्यादा आहे या मर्यादेंत आर्थिक सुधारणा झाली तर ती नीतीस पोषक असते. तेथें सम प्रमाण असतें. परंतु सुखोपभोग फारच वाढले, धनदौलत फारच वाढली तर नीति सुधारण्याऐवजीं, उलट मनुष्य नीतिभ्रष्ट होतो. मग व्यस्त प्रमाण होतें. सुखोपभोग फार वाढला तर नीति कमी होत जाईल. म्हणून महात्माजी सांगतात कीं, उगीच वायफळ गरजा वाढवण्यांत अर्थ नाहीं. जास्त पैसा जवळ झाला तर नैतिक अध पात होतो. हें जें सत्य त्याच्याकडे समाजवाद्यांनीं लक्ष दिलें नाहीं महात्माजी दोन्ही डोळ्यानीं पाहतात आवश्यक गरजा भागल्या पाहिजेत, हेंहि खरें; तसेंच फाजील गरजा वाढवू नका हेंहि खरें. लोकशाहींत ज्याप्रमाणें ते नैतिक प्राण आणू पाहतात, लोकसत्ता नैतिक पायावर ते उभी करूं पाहतात, त्याचप्रमाणें अर्थकारणातहि नीति असली पाहिजे, तेथेंहि नीतीची वाढ झाली पाहिजे असें ते म्हणतात. आणि ही नीतीची वाढ व्हावी म्हणून जीवनोपयोगी आवश्यक गरजा

भागवा, परंतु फाल्तु गरजा वाढवूं नका असें ते म्हणतात. देहाचे फाजील चोजले पुरवूं तर आत्मा गुदमरेल. नीतीची धार बोथट होईल. सदसद्विवेकबुद्धीची मंजुळ मुरली ऐकूं येणार नाहीं. एकदां याविषयीं ' आर्थिक व नैतिक सुधारणा ' या शीर्षकाखालीं महात्माजींनीं एक मजेदार लेख लिहिला होता. त्या लेखांत ते म्हणतात, " अत्यन्त दरिद्री मनुष्य ज्याप्रमाणें आपली नीति टिकवूं शकत नाहीं हें खरें, त्याच-प्रमाणें अति श्रीमंत मनुष्यहि नीति टिकवूं शकत नाहीं हेंहि खरें. खिस्तानें म्हटलें आहे कीं, एकवेळ सुईच्या नेढ्यांतून उंट पलीकडे जाईल, परंतु स्वर्गाच्या राज्यांत श्रीमंत मनुष्य जाणें कठीण. " अतिसंग्रही मनुष्यास परमेश्वराच्या राज्यांत प्रवेश नाहीं. खिस्ताकडे एकदां एक श्रीमंत मनुष्य आला. तो खिस्ताला म्हणाला, ' भगवन्, मी तुमच्या सर्व आज्ञा पाळीत असतों. ' तेव्हां खिस्तानें विचारलें, ' जवळ कांहीं पुंजी आहे का ? संग्रह केलेला आहे का ? ' तो म्हणाला, ' हो, संग्रह बराच आहे. ' खिस्त म्हणाला, ' तर मग तो संग्रह देऊन टाक. ' तो श्रीमंत मनुष्य पुन्हां खिस्ताकडे कधीं गेला नाहीं. याच प्रसंगीं तें सुप्रसिद्ध वाक्य खिस्त उद्गारला: " सुईच्या नेढ्यांतून उंट जाईल, परंतु स्वर्गाच्या राज्यांत श्रीमंत जाऊं शकणार नाहीं. "

महात्माजींची ही अशी दृष्टि आहे. आर्थिक उन्नति नाहीं तोंपर्यंत नैतिक उन्नति होऊं शकत नाहीं. या सिद्धांताला-हि कांहीं मर्यादा आहेत. गरजा कमी असलेल्या धन्या असें नैतिक दृष्टीचा मनुष्य म्हणतो. परंतु विशिष्ट मर्यादेपर्यंतच्या सर्व गरजा मात्र भागल्याच पाहिजेत. असें हें महात्माजींचें

स्वराज्य आहे. नैतिक कायद्याचें जेथें साम्राज्य आहे, असें हें स्वराज्य आहे. जीवनाच्या प्राथमिक गरजा जेथें भागवल्या जातात असें हे स्वराज्य आहे. हें स्वराज्य अहिंसेनें आणावयाचें आहे. नैतिक शक्तीवर जें स्वराज्य आधारावयाचें आहे तें अहिंसेशिवाय कसें शक्य होईल ?

इंग्लडमध्यें, अमेरिकेंत, फ्रान्समध्यें जी लोकशाही आहे ती खरी नाहीं. लोकशाहीचा डोलारा तेथें आहे. लोकशाहीची कुडी तेथें आहे, परंतु तींत प्राण नाहीं. बाह्य स्वरूप लोकशाहीचें परतु आतील गाभा भांडवलशाहीचा आहे. अशी ही तकलादू लोकशाही सुद्धा सशस्त्र क्रान्तीनें आणू म्हणू तरी ती टिकत नाहीं असा इतिहास आहे. ज्या लोकशाहीसाठीं सशस्त्र क्रान्त्या झाल्या, ती लोकशाही तर नाहींच आली, बाह्य स्वरूपी लोकशाहीहि नाहीं आली, तर उलट हुकूमशाही सत्ताच तेथें स्थापन झाल्या. इंग्लडमध्यें चार्लसला ठार मारल्यावर क्रॉमवेलची हुकूमशाही आली. फ्रान्समध्यें क्रान्ति झाली आणि नेपोलियनची हुकूमशाही मानगुटीस बसली. रशियात स्टॅलिनची हुकूमशाही आली १७८९ मध्यें फ्रान्समध्यें जेव्हा ती प्रसिद्ध लोकशाही क्रांति झाली, त्या वेळेस सर्वांना वाटत होतें कीं, आता जगांत सुवर्णयुग येणार, जगाचा उद्धार होणार. रूसोनेंच प्रथम " जनतेची खरी सत्ता " हे शब्द उच्चारले " The real sovereignty of People " हे त्याचे शब्द. रूसोचे हे शब्द घेऊन महात्माजी लिहितात, " मनुष्य जन्मत स्वतंत्र आहे. रूसो म्हणतो, लोकाची सत्ता सर्वत्र हवी. परतु आज ज्या कांहीं लोकशाह्या जगात आहेत त्याच्याकडे जर पाहिलें तर आपणास काय

दिसेल ! लोकशाहींत जनतेची सत्ता हवी असें रूसो म्हणे. परतु खरी लोकसत्ता आज कोठेंहि नाहीं मध्ययुगातील सरजामशाही व आजची लोकशाही यात विशेष अतर आहे असें मला वाटत नाहीं. सरजामशाही कोलमडून पडून जेव्हा लोकशाही आली तेव्हां सर्व दु खावर रामबाण उपाय सांपडला असें सर्वांस वाटलें परतु वस्तुस्थिति काय आहे ? ते सरजामशाही सरदार आपापल्या उच किल्ल्यातून रहात. वेळीं अवेळीं केव्हातरी लोकावर स्वारी करीत. लूट घेऊन जात. अर्धवट रानटी, असंघटित, लहरी, असे ते सरजामशाही सरदार होते. परतु ते गढीवाले, मधून मधून विद्युत्पाताप्रमाणें येऊन लूटमार करणारे सरदार जाऊन त्याच्या ऐवजीं आज लुटारू पुजिपति आले आहेत. लहरी लूटमार करणारे गेले परतु आज फायदेशीर रीत्या मुकाट्यानें सर्व जगाची सघटित रीतीनें पिळवणूक करणारे भाडवलदार दिसत आहेत सघटित डाकूगिरी आज चालली आहे. किल्लेदार गेले व भाडवलदार आले. सर्व देशातून ही अशी पिळवणूक चालली आहे ती हिंसा हरघडी चालली आहे हें अपरपार रक्तशोषण चाललें आहे. ज्या देशांत अशी ही पिळवणुकीची हिंसा सभोंवतीं आहे त्या देशांत राहून मी अहिंसा पाळतों असें म्हणणें हा अहकार आहे हा खोटा अभिमान आहे." म्हणून सर्व जगाच्या विरुद्ध बड केलें पाहिजे असें महात्माजी म्हणतात त्या पूर्वीच्या मध्ययुगातील लुटारूची डाकूगिरीं उघड उघड दिसे तरी परतु आजची ही लूटमार लोकशाहीच्या नांवाखालीं बिनबोभाट चाललेली असते लोक एकीकडे भ्रमांतच असतात कीं, आपण लोकसत्ता अनुभवीत

आहेत. शांततेचा काळ आहे, सत्याचा काळ आहे, असा भ्रम हे भांडवलदार निर्माण करीत असतात. ही स्थिति फारच धोक्याची आहे. उघड अन्याय दिसला तर मनुष्य बंडास तरी प्रवृत्त होतो; परंतु जेथें लोकशाहीच्या बुरख्या-खालीं पिळवणूक केली जात असते, तेथें पटकन् कांहीं लक्षांतहि येत नाहीं. आंतून रक्तशोषण तर सारखें होत असतें; पण कोण कसें हें रक्तशोषण करीत आहे हें जन-तेस कळत नाही. ते सरंजामशाही सरदार शरीरेंच बंधनांत घालीत; परंतु आजची भांडवलशाही मनाला व आत्म्यालाहि गुलाम करीत आहे. हळूहळू जनतेचा आत्माच आज मारला जात आहे. आत्म्याला इजा पोंचत आहे. ”

असें हें जग कसें सुधारावयाचें ? बहुजनसमाजास अन्नवस्त्र कसें द्यावयाचें ? त्यांची खरी नैतिक सत्ता कशी स्थापावयाची ? जगाची सुधारणा करण्याचे दोन मार्ग रूढ आहेत: १ सुधारणावाद, २ सशस्त्र क्रान्तिवाद; परंतु हे दोन्ही मार्ग फसले आहेत. सुधारणावादी हळूहळू सुधारणा करावी असें म्हणतात. ते कांहीं तरी थातुर मातुर करूं पाह-तात. परंतु डोंगराला दुखणें व शिपींत औषध तशांतली त्यांची गत होते. अशा वरवरच्या मलमपट्टीनें कांहीं एक होणार नाहीं. सामाजिक व राजकीय अन्यायांच्या मुळाशीं ते जात नाहींत. आणि ते क्रांतिवीर एकदम हिंसेनें सर्व बदल करूं पाहतात. परंतु तो बदलहि वरपांगी होतो. तात्पुरती एकाच्या हातची सत्ता दुसऱ्याच्या हातीं गेली असें दिसतें. परंतु त्यानेंहि प्रश्न सुटत नाहीं. जनतेची नैतिक शक्ति जों-पर्यंत जागृत झालेली नाहीं तोंपर्यंत खऱ्या अर्थानें प्रश्न

सुटणार नाहीं. राज्यसंस्थेची जसजशी आपण सुधारणा करूं तसतशी सर्व समाजात सुधारणा होईल असें म्हणणारे एका गोष्टीकडे दुर्लक्ष करितात. राज्यसंस्थेंत जें पाप दिसतें तें कोठून आलेलें असतें ? सामाजिक पापातूनच राज्यसंस्थेंतील पाप जन्मतें समाजातील पापाचें प्रतिबिंब शासनसंस्थेंत पडत असतें. समाजातील जी आर्थिक घटना असते तिच्या रक्षणासाठीं म्हणून राज्यसंस्था असते समाजरचनेंतून राज्यसंस्थेंतील पाप जन्मतें. हें जें समाजातील पाप तें जर आपण न काढू तर राज्यसंस्था तरी कशी सुधारणार ? समाजसुधारणा आधीं कीं राज्यसंस्थेची सुधारणा आधीं ? महात्माजी सुंदर दृष्टान्त देऊन लिहितात, "समुद्रातील लाटा या उगीच नाहीं उठत समुद्रावर उठणाऱ्या लाटा थांबवायच्या असतील तर वादळ थांबवा. वादळामुळे त्या लाटा उठल्या आहेत." वादळ समाजघटनेंत होत असतें, आणि मग सर्वत्र असंतोषाच्या लाटा उसळतात. अशीं हीं वादळें उठूं नयेत असें वाटत असेल तर समाजरचना सुधारा. हीं वादळें थांबवायचीं असतील तर महात्माजी म्हणतात, "जनतेनें स्वत:ची आत्मशुद्धि केली पाहिजे. जें पाप होत असेल त्यात भागिदार होतां कामा नये." समाजात जें पाप होत असतें, जी अन्याय्य विषमता असते, तिचें रक्षण शासनसंस्थेमार्फत होत असतें. समाजातील पाप नष्ट व्हावें म्हणून प्रत्येकानें स्वत:ची शुद्धि करावी. एवढेंच नाहीं तर ज्या शासनसंस्थेमार्फत त्या पापाला पाठिंबा व संरक्षण मिळत असतें, त्या शासनसंस्थेशीहि प्रत्येकानें असहकार करणें आवश्यक आहे. तें प्रत्येकाचें धर्ममय कर्तव्यच आहे. सर-

कारी राज्यतंत्रातून मी अंग काढून न घेईन, या सरकारशीं जोंपर्यंत मी सहकार करीत राहीन, तोंपर्यंत माझी खरी आत्मशुद्धि झाली असें म्हणता येणार नाहीं पापाशीं असहकार हा माझा धर्म आहे. असा हा आत्मशुद्धीचा व्यापक मार्ग महात्माजी दाखवीत आहेत आत्मशुद्धि करा, समाजसुधारणा करा, असें सांगणारे महात्माजींच्या पूर्वी पुष्कळच झाले. परंतु जोंपर्यंत पापी सरकारशीं तुम्हीं असहकार करीत नाहीं तोंपर्यंत आत्मशुद्धि नाहीं, असें सांगणारे महात्मा गांधी हेंच पहिले क्रान्तिकारी महापुरुष. स्टेटला जो सहकार तुम्ही देत आहात तो काढून घ्या असें गांधीजी सांगतात. आत्मशुद्धि व सरकारशीं असहकार याचा कसा संबंध आहे हें महात्मा गांधींनीं अशा रीतीनें दाखविलें आहे असहकाराचें महान् तत्त्व गांधीजींनींच जगाला प्रथम दिलें. समाजसुधारणेसाठीं आत्मशुद्धि हवी आणि आत्मशुद्धि हवी असेल तर पापी सरकारशीं असहकार करा. असें हें अभिनव क्रान्तिशास्त्र आहे.

महात्माजी सुधारणावादी आहेत कीं क्रान्तिकारी आहेत? ते म्हणतात, "मी सुधारणावादी क्रान्तिकारी आहें, उत्क्रान्तिवादी क्रान्तिकारी आहे." महात्मा गांधींची ही क्रान्ति म्हणजे Evolutionary Revolution (उत्क्रान्तिरूप क्रान्ति) आहे जगात काय असावें? उत्क्रान्ति असावी कीं क्रान्ति असावी? सृष्टींत दोन्हीं प्रकार आहेत त्याचा विचार पुढें केव्हां तरी करू

आज आपण हें पाहिलें कीं, महात्माजींचें सारें तत्त्वज्ञान आत्मशुद्धींतून निघालें आहे. आणि ती त्यांची आत्म-

शुद्धीची कल्पना जगाच्या शुद्धीपर्यंत वाढत गेली. महात्माजींची जी ही दृष्टि ती कळल्याशिवाय त्याचें दर्शन, त्यांचें तत्त्वज्ञान कळणार नाहीं. स्वामी रामतीर्थांनीं एकदा आपल्या लेखांत एक जाहिरात दिली होती. " पाहिजेत. सुधारणा करणारे. परतु जगाची नव्हे तर स्वत.ची. " ( Wanted Reformers of themselves, not of others.) असे सुधारक फार आढळत नाहींत. आत्मशुद्धि करून समाजाची शुद्धि करणारे सुधारक फार थोडे आढळतात. महात्मा गांधी हे अशा अभिनव प्रकारचे सुधारक आहेत. तेहि एक क्रान्तिकारक आहेत परंतु आपल्या जीवनांत ते प्रथम क्रान्ति करू पाहतात. क्रान्ति प्रथम आपल्या जीवनात झाली पाहिजे. असें होईल तेव्हांच नवें जग आपण निर्माण करूं शकूं. स्वतःला नवीन करा, स्वत.चा पुनर्जन्म करा, स्वत.चा उद्धार करा. मग तुम्ही नवें जग बनवाल, जगाचा पुनर्जन्म कराल; जगाचा उद्धार कराल जगाची सुधारणा बॉंब आणून होणार नाहीं, आरमारें वाढवून होणार नाही, विमानांनीं होणार नाही. ही जागतिक क्रान्ति चर्चिल, रूझवेल्ट, स्टॅलिन करू शकणार नाहींत. परतु महात्माजी म्हणतात, आत्मविश्वासानें म्हणतात, कीं खरी क्रान्ति मीच करू शकेन. रूझवेल्ट, चर्चिल, स्टॅलिन, इत्यादींच्या मार्गांपेक्षां महात्माजींचा मार्ग भिन्न आहे. तो मार्ग कसा कोठें भिन्न आहे हें आपण समजावून घेतलें पाहिजे. महात्मा गांधी आत्मशुद्धीच्या, व्यापक आत्मशुद्धीच्या द्वारा जगात सुधारणा व क्रान्ति करूं पाहतात. महात्माजी युद्धाची, अशांतीचांच

परिभाषा वापरतात. मलाहि युद्ध करायचें आहे, क्रान्ति करायची आहे असें ते म्हणतात. व्यवहारात रूढ असलेले शब्दच ते वापरतात परंतु त्यांच्या शब्दांतील सूक्ष्म अर्थ पुष्कळ वेळा आपणास समजत नाहींत. म्हणून महात्माजींच्या शिकवणीप्रमाणें आचरण कसें करावें याचा कधीं कधीं आपणास नीट उलगडा होत नाहीं. ते अहिंसेचे उपासक आहेत. अहिंसेनें प्रतिकार करणारे ते महान् योद्धे आहेत. परंतु माझा मार्ग झेपत नसेल तर हिंसेनें प्रतिकार करा असेंहि ते सांगतात. "हिंसाऽपि क्लैब्यात् श्रेयसी" असें त्यांचें स्वच्छ मत आहे. "क्लैब्य मा स्म गम पार्थ" हें भगवद्गीतेंतील वचन त्यांच्या वरील मतास आधार आहे. परंतु ते पुन पुन्हा सांगतात कीं "हिंसेच्या मार्गानें आज हजारों वर्षें मानव जात आहेत. हा मार्ग विफल झाला आहे. त्याची निष्फलता स्पष्ट दिसून आली आहे असें विफल हत्यार पुन्हा हातीं धरण्यांत काय अर्थ ! रशियांतील लोक आज खऱ्या अर्थानें सुखी व स्वतंत्र आहेत असें मला वाटत नाहीं" असें ते म्हणाले "जगात खरी क्रांति अद्याप झालीच नाहीं ती क्रांति मीच करूं शकेन आणि ती अहिंसेच्याच मार्गानें होणें शक्य आहे. इतर मार्गांनीं नाहीं." असें अधिकार वाणीनें ते सांगतात, आत्मविश्वासानें नि अनंत श्रद्धेनें ते सांगतात.

## प्रवचन ३ रें

क्रान्तिवाद नि सुधारणावाद या दोन मार्गांनीं जगाला सुधारण्याचे प्रयत्न चालले आहेत, असें कालच्या प्रवचनाच्या वेळेस मीं सांगितलें. या दोन्ही मार्गांहून महात्मा गांधींचा मार्ग भिन्न आहे. असहकार अधिक सत्याग्रह यांनीं समन्वित असा हा गांधीजींचा मार्ग अभिनव आहे, अपूर्व असा आहे. महात्माजींच्या मतें क्रान्तिवाद आणि सुधारणावाद अपुरे आहेत युरोपांत हे मार्ग बऱ्याच काळापासून रूढ झाले आहेत महात्मा गांधी स्वतःला क्रान्तिकारक समजतात. मीहि क्रान्ति करूं इच्छितों, असें अनेकदा त्यांनीं म्हटलें आहे, लिहिलें आहे. परंतु क्रान्तीची त्यांची कल्पना भिन्न आहे. त्यांना अधिकाधिक निर्दोष, अधिक पूर्ण नि सर्वांगीण अशी क्रान्ति हवी आहे. जीवनाच्या सर्व क्षेत्रांत क्रान्ति करूं पाहाणारे सोव्हिएट रशियांतील क्रान्तींतहि कांहीं दोष परंतु महात्माजींची क्रान्ति सर्वांगीण असली तरी सर्वांची नाहीं. ती अहिंसक आहे.

इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशात लोकशाही क्रांति झाली. या देशात हळूहळू सुधारणा व्हावी म्हणणारे व जलद सुधारणा व्हावी म्हणणारे असे पक्ष उत्पन्न झाले. महात्माजींचें साधर्म्य त्वरेनें सुधारणा व्हावी म्हणणाऱ्या पक्षांशीं अधिक आहे, परतु महात्माजींचा विशेष अहिंसेंत आहे. शत्रूला मारायचें नाहीं. हा चाह्यात्कारी भेद समजायला अतरंगाचाहि विचार करायला हवा. क्रांति परिणामकारक व्हावी म्हणूनच गांधीजी अहिंसेवर भर देतात. आत्म्याचें, हृदयाचें परिवर्तन होऊन जी क्रांति होईल ती टिकेल असें त्याना वाटतें. तीच क्रांति टिकेल. महात्माजींच्या क्रांतिशास्त्रांत हृदयपरिवर्तनास महत्त्वाचें स्थान आहे. किंबहुना या क्रांतिशास्त्राचा हा प्राणच आहे.

### सुधारणावाद नि क्रान्तिवाद

ब्रिटिश लोक साधारणपणें क्रांतीच्या विरुद्ध असतात. क्रांतिवृत्ति ही नैसर्गिक नाहीं, सृष्टीच्या विरुद्ध अशी ही वृत्ति आहे, असें ते प्रतिपादतात, परतु त्यांचें म्हणणें खरें नाहीं. विकास कसा होतो ? जगद्विकासाचें तत्त्व क्रांतिमय आहे कीं उत्क्रांतिमय आहे ? या सृष्टींत क्रमविकास आहे कीं क्रांतिविकास आहे ? महात्माजींनीं एका लेखात याला उत्तर दिलें आहे ते लिहितात "या सृष्टींत क्रमविकास आहे तद्वत् क्रांतीहि आहे. एकदम मोठा फरक होणें, महान् परिवर्तन होणें ही गोष्ट अनैसर्गिक नाहीं परमेश्वराच्या या निसर्गांत ही गोष्ट दिसून येते. निसर्गांत केवळ उत्क्रांतीच नाहीं, तर क्रांतीहि आहे. परमेश्वर हा महान् क्रान्तिकारक आहे असें निसर्गाकडे पाहून वाटतें." हा अनुभव नवीन नाहीं. मनुष्याच्या अतःकरणात जी वृत्ति असते तिनें तो सृष्टीकडे

बघतो मार्क्सवादी सर्वत्र विरोधविकासाचें तत्त्व लावतो, अध्यात्मवादी सर्वत्र आत्मतत्त्व पाहतो. भौतिक क्रान्तिकारकाला सर्वत्र विरोधविकास दिसेल तर आध्यात्मवादी मनुष्याला सर्वत्र ईशशक्ति काम करीत आहे असें वाटेल. आपण कोणाला क्रांतिवादी म्हणतों, कोणाला सुधारणावादी म्हणतों. महात्मा गांधींना कोणती संज्ञा द्यावयाची ? ते उभयरूप आहेत ते क्रांतिवादीहि आहेत व सुधारणावादीहि आहेत सृष्टींत ज्याप्रमाणें क्रमविकासहि आहे, क्रांतीहि आहे, त्याप्रमाणें महात्माजींच्या जीवनशास्त्रात उभय गोष्टी आहेत म्हणूनच त्यांचें विकासशास्त्र सपूर्ण आहे, तें एकांगी नाहीं सृष्टि योग्य काळीं क्रान्ति व उत्क्रान्ति दोहोंचा अवलंब करते. जन्ममरण हें द्वंद्व पहा नऊ महिने मूल क्रमशः वाढत असतें, परंतु एक दिवस अकस्मात् जन्म. नऊ महिने क्रमविकास तर एक दिवस क्रान्ति तसेंच मरण आजारी असतो, परंतु पुढें एका क्षणात सारा खेळ खलास होतो. मनुष्य जन्माला आल्यावर पुन्हा क्रमविकास सुरू होतो. यातहि मधून क्रान्ति होते, मधून महान् बदल होतात आणि शेवटीं मरणाची महान् क्रान्ति येते. मनुष्याच्या विकासाला जीवन व मरण दोन्ही आवश्यक परमेश्वर हा महान् क्रांतिकारक आहे. महात्माजी लिहितात "पर्वत हळूहळू वाढले, उभे राहिले, परंतु एकदम उत्पात होतो ते गडप होतात. मी आकाशाकडे कधीं कधीं आदरानें, आश्चर्यानें बघत असतों त्या निरभ्र आकाशात एकदम मेघमाला समीदित होतात. त्या नितान्त शान्त आकाशात एकदम केवढा फरक !" ते अन्यत्र म्हणतात इंग्लंडच्या, हिंदुस्थानच्या, दोहोंच्या इतिहासांत

मीं क्रान्ति आणि क्रमविकास दोन्ही गोष्टी पाहिल्या आहेत आज इंग्रज लोक क्रान्तीच्या विरुद्ध बोलतात, कारण त्यांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटलेला आहे ज्याच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटतो ते क्रमविकासवादी होतात, ज्याचें पोट रिकामें असतें ते क्रान्तिवादी होतात पोट भरलेलें असलें म्हणजे दोन तासानीं राजकारण केलें तरी चालतें परतु जो भुकेला आहे तो अशी वाट पहात बसेल तर तो निकालात निघायचा तो थांबेल तर मरेल. "

### इतिहासात दोन्ही मार्ग

गांधीजी इतिहासात क्रान्ति व उत्क्रान्ति दोन्ही पाहातात कोणी म्हणतात, विचारतात, "गांधींनीं इतिहास वाचला तरी आहे का ?" महात्मा गांधींनीं इतिहासाचा तपशील वाचला नसेल, पान न् पान नसेल वाचलें, परतु भाराभर वाचणें म्हणजे तत्त्वग्रहण नव्हे इतिहासाकडे पाहाण्याची दृष्टि महात्माजींना मिळाली आहे इतिहासातून काय घ्यावें, काय शिकावें काय टाकावें, कोणत्या दृष्टीनें इतिहासाकडे बघावें, या गोष्टीला महत्त्व आहे इतिहास अनुकरणार्थ नमून नवइतिहास तुम्हीं आम्हीं निर्माया म्हणून आहे नवनिर्मिति करण्यासाठीं जुना इतिहास अभ्यासायचा असतो भूतकालीन इतिहासाकडे पाहाण्याचा महात्माजींची दृष्टि केवळ सुधारणा वादी नाहीं, केवळ क्रान्तिवादी नाहीं या दोन्ही दृष्टींहून त्याची दृष्टि भिन्न आहे. सुधारणावादी एक प्रकारचे जड सनातनी असतात मागील पराक्रमाचे पोवाडे गात बसण्यात त्याना आनद होत असतो पूर्वज कसे मोठे होते, आपण त्यांच्या प्रमाणें झालें पाहिजे, त्यांचें अनुकरण केलें पाहिजे असें केवळ

आंतरिक सृष्टींतहि नको का करायला ? हें आंतरिक जग दिसलें नाहीं तरी तें सर्वांच्याजवळ सदैव आहे तें सर्वांच्या प्रतिक्षणीं अनुभवास येतच असतें. आपण नवीन क्रान्तिमार्ग शोधू या. आध्यात्मिक सृष्टींतील क्रान्ति- मानवानें नेहमीं का पशूप्रमाणेंच वागावें ? टक्केटोणपे खाऊन अधिक शहाणें नको का व्हायला ? मी मानव आहे, मी पशूहून निराळा आहे, असें नुसतें म्हणून भागत नसतें. पशूहून निराळे असाल तर पशूहून निराळ्या रीतीनें वागा. मनुष्यत्वास शोभेल अशा रीतीनें आपण इतिहास बनवू या मानव्याला उन्नत करील अशी क्रांति करू या. क्रान्तिशास्त्राला निराळी दिशा देऊ या "

## आत्म्याची तरफ

असें गांधाजी म्हणत आहेत. ते जी क्रान्ति करू पहात आहेत, तिची तरफ तुमच्या आमच्या अंतःकरणांत आहे. त्या तरफेच्या जोरावर सारें जग बदलायचें आहे महात्माजींनीं आपलें सत्याग्रहाचें शास्त्र, आपलें क्रान्तिशास्त्र या आत्म्याच्या शक्तींतून निर्मिलें आहे महात्माजींचें प्राप्तव्य काय ? गन्तव्य काय ? त्याचें ध्येय काय ? रामराज्याची भाषा ते बोलत असतात. रामराज्य हें माझें ध्येय असें ते म्हणतात. अहिंसेवर उभारलेली लोकशाही मला हवी आहे असें त्यांनीं शतदा सांगितलें आहे, लिहिलें आहे नैतिक पायावर, ऋत-सत्याच्या दृढ आधारावर उभारलेली लोकशाही त्यांना हवी आहे. नैतिक नियमाच्या सुप्रतिष्ठेवर, श्रेष्ठत्वावर आधारलेली लोकशाही हें त्यांचें गन्तव्य आहे समाजवाद, लोकशाही इत्यादि कल्पनांत, या विचारांत महात्माजी स्वत चें काहीं तरी विशेष ओतू पाहतात. या कल्पना रूढार्थानें ते स्वीकारीत

नाहींत. त्या जशाच्या तशा ते घेत नसून त्यांत नवीन अर्थ ते ओततात. या कल्पनात माझें रामराज्य मला हवें असें ते म्हणतात. तें रामराज्य ज्या समाजवादात, ज्या लोकशाहीत नाहीं, त्याचें मला काय होय? समाजवाद, लोकशाही, इत्यादींचें पर्यवसान माझ्या रामराज्यात व्हायला हवें. रामराज्य म्हणजे काय? रामराज्य म्हणजे आत्मारामाचें राज्य, आत्म्याचें राज्य. तो इतिहासपूर्वकालीन दाशरथी राम येथें अभिप्रेत नाहीं. ती स्थूल कल्पना महात्माजींजवळ नाहीं. महात्माजींचा राम म्हणजे जो अंतःकरणात पूर्वी होता, आज आहे, पुढें असेल, तो आत्माराम होय. या रामाचें चिन्मय राज्य त्यांना हवें आहे. ही जी हृदयातील आध्यात्मिक दिव्यता, तिचें सहजसुंदर राज्य त्यांना हवें आहे. सर्वांना जर हें आत्मदर्शन झालें, त्या आत्मदर्शनाच्या आनंदात सारे जर मस्त होऊं लागले, तर सारे सत्यनिष्ठ होतील, सारे एकमेकांवर निर्मळ, अवर्णनीय असें प्रेम करूं लागतील. बाहेर कोणती शाही आहे याचें त्यांना भानहि नसेल. बाहेरचें स्वरूप कोणतेंहि असो, आपण होऊनच सारे नैतिक वृत्तीनें वागतील. खरा मानवधर्म आचरतील. तेथें मग नकोत दंडयोजना, नकोत शिक्षाप्रकार. तेथें शासनसंस्थाच उरणार नाहीं. ती गळून पडेल. तिची जरूरच उरणार नाहीं. सर्वत्र आत्मारामाचें एकछत्री राज्य! जणू सत्ययुगाचा सूर्य उगवला. महात्माजींच्या समोर हें असें परम मंगल, परम दिव्य ध्येय आहे. हें रामराज्य प्रथम प्रत्येकाच्या हृदयात स्थापन व्हायला हवें. सर्वांच्या हृदयांत रामरावण आहेत. तेथें रात्रंदिवस युद्ध चाललें आहे. तुकाराम महाराजांनी म्हटलें आहे

" रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग,
अन्तर्बाह्य जग आणि मन । "

राम म्हणजे सद्बुद्धि, न्याय्य वृत्ति. रावण म्हणजे अहंकारी वृत्तीचें प्रतीक. रावण अन्याय्य वृत्तींचें द्योतक. आपणांस खरी लोकशाही हवी असेल तर आपण प्रथम अंतःकरणांत मेळ घातला पाहिजे. तेथील गदारोळ बंद केला पाहिजे. तेथें रामाचें म्हणजेच सत्याचें निरपवाद राज्य स्थापलें पाहिजे.

### महात्माजी शासनहीन ध्येयाचे पुरस्कर्ते

गांधीजींना लोकशाहीचें शेवटीं अ-राजक स्थितींत परिणमन व्हावें असें वाटतें. राज्यतंत्रच नको. शासनसंस्थाच नको. कारण शासनसंस्था म्हटली म्हणजे हिंसा आलीच. या जगांत सहकार्यानें सारा मानवसमाज वागत आहे हें गांधीजींच्या विचारांचें परम ध्येय आहे, अंतिम सार आहे. तें ध्येय डोळ्यासमोर ठेवून ते पावलें टाकतात. ती जी अंतिम दंडहीन व्यवस्था, तिच्या निकषावर घांसून, त्या ध्येयाच्या कसोटीवर पारखून ते योग्य काय, अयोग्य काय तें ठरवितात. ती जी अंतिम अ-राजक स्थिति, तेथें सक्ती अस्तास जाईल. तेथें पोलीस नाहीं, लष्कर नाहीं. तें ध्येय डोळ्यांसमोर ठेवून आपण जाऊं या, असें गांधीजी अट्टाहासानें सर्व जगाला सांगत आहेत. आपणांस एकदम आज ही अ-राजक स्थिति, ही सहज सहकार्याची सुंदर, मंगल स्थिति आणतां येणार नाहीं ही गोष्ट खरी; परंतु ध्येय तरी हें असूं दे. राज्यसंस्था हें अंतिम ध्येय नको. राज्यसंस्था, शासनसंस्था, हें अलीकडचें ध्येय आहे. अपूर्णावस्थेंतील हें ध्येय आहे. हा एक टप्पा

आहे. त्या अ-राजक स्थितीच्या जवळ जायला अत्यन्त जवळचा मार्ग म्हणजे अहिंसेवर आधारलेली लोकशाही होय. Democracy based on nonviolence is the nearest approach to the purest form of anarchy. विशुद्धतम अ-राजक ध्येयाजवळ जायचा अत्यन्त निकटवर्ति मार्ग म्हणजे अहिंसक लोकशाही.

## हिंसक लोकशाही लोकशाहीच नव्हे

जी लोकशाही अहिंसेवर आधारलेली नाहीं, ती लोकशाहीच नव्हे. लोकशाही नि अहिंसा याचा संबंध कसा, कोठें येतो? आज जी लोकशाही आहे तिच्यासंबंधीं सत्याग्रहीला आकर्षण वाटतें. कारण तें जें अखेरचें अ-राजकतेचें ध्येय त्याच्याकडे या मार्गानें जाण्याची त्याला शक्यता वाटते. समाजवादातहि सत्याग्रहीला आकर्षकता वाटते. परंतु हुकुमशाही राज्यपद्धतींत असें काहींच नसतें. सत्याग्रहीला सर्वांत त्याज्य जर काहीं वाटत असेल तर हुकुशाही. मग ती हुकुमशाही फॅसिस्ट असो वा कम्युनिस्ट असो. महात्मा गांधी स्वत ला लोकशाहीचे पुरस्कर्ते समजतात. "लोकशाही चालवायचें ज्ञान मला जितकें आहे तितकें क्वचितच कोणास असेल" असें ते म्हणतात. हुकुमशाही राज्यसंस्था सत्तीनें सर्वांची स्वत.च्या नमुन्याप्रमाणें सुधारणा करू पहाते. अशी सर्वंकष शासनसंस्था जीवनाच्या अंगप्रत्यंगात घुसते. जीवनाचा असा यत्किंचितहि भाग उरत नाहीं कीं जेथें या हुकुमशाही पद्धतीचे पाश पोंचत नाहींत. अशा या राज्यसंस्थेचें प्रभुत्व माझ्या सर्व जीवनावर सारखें चालत असतें. टप्परी पार्टिच्याच्या जोरावर हुकुमशाहीपद्धति हें सारें करीत असते.

तेथें मला विचार करण्याचेंहि स्वतंत्र्य नाहीं, मग आचार-स्वातंत्र्य तर दूरच राहिलें. हुकुमाप्रमाणें वागायचें एवढेंच तेथें काम. अशानें माझा विकास कसा व्हायचा ? मी काहीं मडकें नाहीं, मी मानव आहें माझा सर्वांगीण विकास, माझी सर्वांगीण उन्नति हें माझें ध्येय. परंतु हुकुमशाहींत माझें मन, माझी बुद्धि ही जणू जड केलीं जातात तीं केवळ बाहुलीं, हुकमाचीं ताबेदार बनतात. हा विकास नसून विनाश आहे.

लोकशाहींत असें नाहीं. राज्यसंस्था सक्तीनें येथें सर्वांची ठरीव साचाची सुधारणा करूं पहात नाहीं. मानवात असा काहीं अंश आहे कीं, ज्याच्या सुधारणेसाठीं सक्ती कराल तर तो नष्टच होईल. मानव मग मानवच राहणार नाहीं. तो जड यंत्रवत् होईल लोकशाहींत सक्ती, हिंसा थोड्या फार प्रमाणात असतीलच. परंतु या गोष्टी असल्या तरी त्यांना मर्यादा असेल. पदोपदीं हिंसा समोर उभी राहणार नाहीं. लोकशाहींत ही मर्यादा गृहीत आहे. अंतिम ध्येयाच्या दृष्टीनें राज्यसंस्थेचें शासन, तिचा दंड, हीं निरुपयोगी आहेत, परंतु संक्रमणावस्थेंत, त्या ध्येयाकडे जात असतांना, या गोष्टींची जरूर लागेल मानवधर्माचें रक्षण करण्यासाठीं गीता हिंसेला अनुज्ञा देते. श्रीकृष्ण म्हणतात

" परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् "

संतांचा सांभाळ आणि दुष्टांचा नायनाट करण्यासाठीं मी अवतरतों असें भगवान् सांगतात. परंतु गीतेंतील हें शिकवण, हिंसेची ही अनुज्ञा राजधर्मांतील आहे, असें आपण

समजून चालूं. काहीं प्रमाणांतच या गोष्टीला सत्यता आहे. खरा जो धर्म असतो तो शस्त्रबलानें, शिक्षा करून, सक्तीनें कधींच कोणास स्थापतां येणार नाहीं. समाजधारणे-साठीं धर्म असतो, आणि समाजाचें जें धारण होतें तें संतांच्या तपानें होतें. " सतो तपसा भूमिं धारयन्ति " हें खरें सत्य. भगवान् म्हणतात कीं, मी दुष्टांना संहारायला नि सज्जनांना, संतांना सांभाळायला अवतरलों आहें. म्हणजे भगवंताच्या अवतारापूर्वी संतत्व, साधुत्व समाजात होतें. कदाचित् तें वावरत होतें. त्याला त्रास होऊं लागला म्हणून प्रभूचा अवतार. परंतु श्रीकृष्णाच्या शस्त्रानें साधुत्वाचें रक्षण झालें तरी तें निर्माण नव्हतें होत. धर्माचा प्राण साधुतांत आहे. हा प्राण शस्त्रें सांभाळतील, परंतु निर्मू शकणार नाहींत. हा प्राणच नसेल तर शस्त्रानीं सांभाळ तरी कशाचा करायचा? जे साधुसंत आपल्या आचरणानें समाजात, मानवी जीवनांत प्रेमस्नेह आणूं पाहतात, मांगल्य निर्मू बघतात, अशा यत्नशील संतांचें संरक्षण करण्यापुरतें शस्त्र उपयोगी आहे. शस्त्रबल नकारात्मक आहे, भावात्मक नाहीं. तें संहारक आहे, निर्माण करणारें नाहीं. तें ऋण आहे, धन नाहीं. ( निगेटिव्ह आहे, पॉझिटिव्ह नाहीं. ) भावरूप प्रयत्न कोणी करायचा? प्रत्यक्ष निर्मिति कोणी करायची? संतसज्जनांनीच तें जीवितकार्य असतें. म्हणून समाजधारणेस शस्त्रापेक्षाहि साधुत्वशक्तीच अधिक उपकारक आहे. समाजांत साधुत्व वाढत राहिलें पाहिजे. सद्गुणसंवर्धन सदैव होत राहिलें पाहिजे. शस्त्रानीं साधुत्व वाढण्याऐवजीं ऱ्हास पावूं लागतें. म्हणून साधुमंत आपलें

स्वतःचें रक्षण, आपल्या साधुत्वाचा संभाळ स्वतःच्या बलिदानानें करतात. " अक्रोधेन जयेत् क्रोधम् " हाच त्यांचा विधायक मंत्र. अशीं वचनें आपण ऐकतों तीं उगीच नाहींत. संतांच्या अनुभवाचें नि शिकवणीचें त्यांत सार आहे. असाधुत्वाला साधुत्वानें जिंका. महात्मा गांधींच्या सर्व तत्त्वज्ञानाचा या विचारांत आरंभ आहे. त्यांचें सारें जीवन-दर्शन या मूलभूत विचारांतून विकसत आलें आहे. शस्त्र-बळ खाजगी असो वा स्टेटचें, शासनसंस्थेचें असो, तें शेवटीं अपुरें पडतें. साधुत्व वाढावें म्हणून सक्ती किती उपयोगी पडणार? राज्यसत्तेचें सर्वंकष प्रभुत्व चालू देणें योग्य नाहीं. शस्त्रबळ, सक्ती हीं साधुत्ववृद्धीला कितीशी हातभार लावणार? सत्य, अहिंसा यांच्याकडे जायची प्रवृत्ति स्वतःच्या प्रयत्नांनींच व्हायला हवी. स्वतःचा आत्माच जागा व्हायला हवा. प्रयत्नांतूनच खरी आत्मप्रगति. स्वतःची सुधारणा व इतरांची सुधारणा यांत द्वैत नाहीं. आपली सुधारणा झाली तर जगाचीहि होईल. माझ्यांत साधुत्व वाढलें तर जगांतहि वाढेल. दैवी संपत्ति वाढवणारे द्वेषमत्सर नाहीं फैलावीत. भौतिक बाबतींत एकाची संपत्ति वाढली तर दुसऱ्या कोणाची तरी कमी होते. तसा येथें प्रकार नाहीं. दैवी संपत्तीचा हा विशेष आहे. दैवी संपत्तीचे लोक समाजधारणेस अधिक महत्त्वाचे असतात. साधुवृत्ति वाढवणाऱ्यांचा समाजांत जसजसा अधिक प्रभाव पडूं लागेल, तसतसा राज्यसंस्थेचा आपोआप संकोच होऊं लागेल. तिची जरूरीच घटेनाशी होईल. साधुत्वाची वाढ ज्या प्रमाणांत होईल त्या प्रमाणांत शासन-संस्थेचें प्रभुत्व, अस्तित्व घटत जाईल. साधुत्वानेंच जर

असाधुत्वाला जिंकायचें तर राज्यसंस्था दंड कोणास करणार, शिक्षा कोणास ठोठावणार? साधुत्वाचें हें बळ कोठें तरी कमी पडतें म्हणून राज्यसंस्थेची आवश्यकता भासते.

### यतिधर्म नि राजधर्म

आजपर्यंत राजधर्म आणि यतिधर्म हे दोन अलग धर्म मानले गेले. यतिधर्म राजधर्माहून श्रेष्ठ मानला जातो. त्याच्या कारभारात राजधर्म ढवळाढवळ नाहीं करीत. राजसत्तेला राजधर्म आणि प्रजेला प्रजाधर्म घालून देणें हें यतिधर्मांचें काम आहे. युरोपात मध्ययुगात खिस्ती धर्माच्या इतिहासांतहि असें थोडें दिसतें. पवित्र रोमन साम्राज्यांत ही कल्पना दिसून येते. साधुत्वानें समाजाचें रक्षण करणार हे राजाहून श्रेष्ठ आहेत पोप, बिशप वगैरे राजाहून श्रेष्ठ. महात्मा गांधींच्या अंतःकरणांत हे असे विचार आहेत. गांधीजी कर्मयोगी आहेत. कर्मयोगाचें विवेचन भगवद्गीतेंत आहे. या अर्थानें ते गीतेचे उपासक आहेत परंतु गीता हा राजधर्माचाहि ग्रन्थ आहे. ज्यावेळेस इतर प्रयत्नांनी प्रश्न सुटत नाहीं तेंव्हा युद्ध धर्म्य ठरतें त्या युद्धास प्रवृत्त करण्यासाठीं ही गीता आहे. शिष्टाईचे सारे उपाय थकले. स्वतः श्रीकृष्ण शिष्टाईस गेले. सारे प्रयत्न निष्फळ झाल्यावर युद्धाशिवाय गत्यन्तर नव्हतें. तें करणें भाग पडलें. परंतु महात्मा गांधी या महाभारतीय युद्धाकडे कोणत्या दृष्टीनें बघतात?

### युद्धाचें वैफल्य

महात्माजींच्या मतें महाभारत म्हणजे एक महान् शोकान्त काव्य आहे. युद्धाच्या मार्गानें येथें अखेर कोणाचेंच हित झालें नाहीं ज्यांनी जिंकलें ते तरी सुखी झाले

का? नाहीं. तेहि रडले. त्यानींहि अश्रु ढाळले तें भारती युद्ध सपतें आणि धर्मराजा सर्वांसह सर्व मृताना, धारातीर्थी पडलेल्याना पिंड द्यायला जातो. करुण असा तो प्रसग आहे. सर्वांचें श्राद्ध करायचें असतें. धर्मराजाच्या मनात काहूर माजतें. तो कर्णाच्या नावानें पिंड द्यायला तयार होतो हा आपला भाऊ, वडील भाऊ हें त्याला आजवर माहीत नव्हतें तो सद्गदित वाणीनें माता कुंतीला म्हणतो: "आई, कर्ण हा आमचा वडील भाऊ हें आम्हाला आधींच कळतें तर आम्हीं युद्ध केलें नसतें मीं तरी केलें नसतें" धर्मादिकास हें कळू नये याचा भावार्थ काय? भावार्थ एवढाच की, अन्यायाचें निवारण व्हायला हवें अन्यायी मनुष्य भाऊ असला तरी त्याचेंहि पारिपत्य व्हायला हवें दुसरा मार्गच नसेल तर अपरिहार्य म्हणून हा हिंसामार्ग, युद्धाचा मार्ग अवलबायचा कठोर होऊन भावा सहि शिक्षा करायची समत्वबुद्धीनें कर्तव्य म्हणून तें युद्ध करायचें हें सारें बरोबर आहे परतु सर्वच ठिकाणीं हिंसा बरोबर असा याचा अर्थ नाहीं परकीयांशीं लढताना अहिंसा आठवतच नाहीं. भावाला कसें मारू मनात येतें परतु परक्यावर प्रहार करताना मनास काहीं वाटत नाहीं. घरच्याशीं लढताना हिंसा करू कीं न करू असा व्यामोह वाटला; परतु असा सर्वांजवळ वागताना का वाटू नये? तुमचा घरगुती नियम विश्वव्यापक करा स्वकीयाशीं जसें वागावें असें वाटतें, तसेंच परकीयाशींहि वर्तन ठेवा. अन्यायी परकी असो, स्वकीय असो, दोघाना मी मारणार; आणि तू 'अन्याय करणारा माझा आहे, मी त्याचें परि-

वर्तन करूं पाहीन' असें म्हणशील तर परकीयांच्या बाबतींतहि तसेंच म्हण. हिंसा स्वजनांच्या बाबतींत निंद्य असेल तर सर्वत्रच ती निंद्य आहे. सर्वत्र समबुद्धि असूं दे. साधुत्वाची मूलभूत प्रेरणा सर्वांच्या अन्तर्यामी आहे. स्वकीयांच्या हृदयांतील सुप्त साधुता जागृत होईल अशी जर तुला आशा वाटेल तर परकीयांच्या बाबतींतहि असें कां वाटूं नये ? साधुत्वाच्या वृत्तीचा ईश्वरानें कोणास कायमचा मक्ता दिलेला नाहीं. भलेबुरे सर्वत्र आहेत. महात्मा गांधींची मानवांतील मूलभूत सत्प्रेरणेवर श्रद्धा आहे. या श्रद्धेवरच त्यांचें सारें दर्शन आधारलेलें आहे. मुलांनी आत्मक्लेशानें आईबापांचें परिवर्तन केल्याचीं उदाहरणें आहेत. आईबाप चुकीचें सांगतील तर आम्ही ऐकणार नाहीं. त्याची आज्ञा मोडूं आणि कष्टहाल सोसूं असें भारतीय मुलें, प्रल्हादासारखीं सत्याग्रही बाळें सांगत आहेत. यतिधर्मांत हा आत्मक्लेशाचा मार्ग होता; परंतु आपल्याकडील राजधर्मांत तो नव्हता. लोकमान्य गीतारहस्यांत म्हणतात, " राजकारणांत असें वागून चालणार नाहीं. यतिधर्मांत हें सारें ठीक आहे. " परंतु प्रजाधर्मांत, राजधर्मांत ज्याप्रमाणें राजकारण आहे, त्याप्रमाणें यतिधर्मांतहि आहे.

### राजकारण आणि राजधर्म भिन्न

राजकारण आणि राजधर्म हे समानार्थक शब्द नाहींत. प्रजाधर्मांत राजकारण आहे, यतिधर्मांतहि आहे. राजधर्म राजापुरता; परंतु राजकारणाची व्याप्ति फार मोठी आहे. ही व्याप्ति लक्षांत घेऊन राजकारणांतील हिंसा दूर करायची असेल तर ती प्रथम यतिधर्मांतून जितकी निघेल, प्रजा-

धर्मांतून जितकी निघेल, तितकी राजधर्मांतून निघणार नाहीं कारण राजधर्माला जणूं सदर परवाना असें वाटत असतें. हिंसा अपरिहार्य, आपला हक्क असें त्याला वाटत असतें. राज्यसंस्था चालवणाऱ्याच्या हिंसा अंगवळणींच पडलेली असते. यतिधर्म, प्रजाधर्म असें नाहीं मानीत. यतिधर्मात स्वसंरक्षणार्थहि हिंसा नाहीं. यति स्वतःचें बलिदान करील. तो पुन्हा असंग्रही असतो. यति आपल्या उदाहरणानें, प्रखर प्रयत्नानें सर्व समाजाला पुढें नेऊं पाहतो, आपल्याबरोबर घेऊं पाहतो. सत्ययुगांत राजधर्मच नव्हता. तेथें राज्यसंस्थाच नव्हती. कारण सारेच स्वयंभू अशा सत्प्रेरणेनें वागत होते. आपोआपच धर्मपालन होत होतें. यतिधर्माच्या पाठोपाठ सारे जात, असें महाभारतांत वर्णन आहे. परंतु जेव्हां संग्रह वाढला तेव्हां शस्त्रबलावर आधारलेली ही शासनसंस्था निर्माण करण्यांत आली. परंतु हीं शस्त्रें इतकीं वाढूं लागलीं आहेत कीं, समाजाचें धारण होण्याऐवजीं संहारच होणार असें दिसूं लागलें आहे. राजसत्तेनें खऱ्या धर्माची स्थापना होते असें महात्मा गांधींना वाटत नाहीं. खऱ्या न्यायाची प्रस्थापना राज्यसत्तेच्या द्वारां होणें अशक्य आहे असें गांधीजींचें निश्चित मत आहे. त्याचा अर्थ दुर्बळ बना, भेकड बना असा नव्हे. ते सर्वांत फाराचा तिटकारा करीत असतील तर भ्याडपणाचा. क्लैब्य नकोच. मला बलवंतांची, समर्थांची अहिंसा पाहिजे आहे, असें गांधीजींनीं शतदां सांगितलें आहे. ज्यांना अहिंसा पेलत नसेल, जे इतके समर्थ नसतील, त्यांनीं अहिंसा दुबळेपणानें पाळावी असें गांधीजी कधींहि म्हणत नाहींत.

महात्माजींना समाजात अहिंसक वृत्तीचे खरे वीर पुरुष हवे आहेत. समाजात असे लोक हवत कीं, जे राज्यसत्तेच्या भीतीमुळें कायदे पाळीत नसून न्यायबुद्धीला प्रमाण मानून कायदे पळतात. असे सत्याग्रही न्यायी वीर कायदे पाळ-तीलहि आणि तोडतीलहि.

### कायदेभंगक गुन्हेगार आणि कायदेभंगक सत्याग्रही

अशा सत्याग्रहींना दंडाचें, शिक्षेचें भय नसतें. ते निर्भय असतात. तेथें छपराछपर नाहीं. गुन्हेगारहि कायदे मोडतात; परंतु त्याच्याजवळ नैतिक कायदाहि नसतो. सत्याग्रही कायदेभंगक हा नैतिक कायदा कधीं मोडित नाहीं. ( Civil Disobedience ) त्याचें कायदेभंगाचें कार्य हें सविनय असतें; कर्तव्य म्हणून असतें. सविनय कायदे-भंग करणारा नैतिक कायदा अभंग मानतो; कर्तव्य-निष्ठा म्हणून, न्यायनिष्ठा म्हणून तो कायदा मोडतो; स्वार्थासाठीं, लहरीसाठीं नाहीं.

### नैतिक कायदा नि सरकारी कायदा

नैतिक कायदा आणि राज्यसत्तेचा कायदा यांत भेद आहे. नैतिक कायद्याचें पालन करून राज्यसत्तेचा कायदा मोडावयाचा. असे करण्याचा हक्कच आहे असें नव्हे तर तें कर्तव्यच आहे. तें कर्तव्य पार पाडण्यासाठीं समत्व-बुद्धीनें, कर्तव्यबुद्धीनें कायदेभंग करावयाचा. समाजातील शासनसंस्थेच्या कायद्याचा भंग करणारा हा सत्याग्रही समाजात दंगल होऊ नये म्हणून मात्र जपतो. बजबजपुरी माजूं नये याचीही तो व्यवस्था करतो.

## राजा व्यवस्थेसाठींच प्रथम आला

प्राचीन काळीं प्रथम ही शासनसंस्था जन्माला आली ती व्यवस्थेसाठींच होय. परंतु ज्याला राजा केलें तोच अन्यायी कायदे करू लागला. यावर उपाय काय? यावर उपाय एकच कीं, या राज्यसत्तेला विरोध करणारा नैतिक वीर हवा. कारण तसें नसेल तर हा गादीवर येणारा आणखी सवाई हिटलर व्हायचा. न्यायासाठीं राजा असावा, न्यायासाठींच त्याला दूरहि करावें असें हें क्रांतिशास्त्र आहे. प्रजाधर्मांत न्यायासाठीं राजा दूर करावा हें महत्त्वाचें अंग आहे.

## प्रजाधर्माची वाढ: सौत्रामणियज्ञ

आपल्याकडे प्रजाधर्माची वाढ करता करता शेवटीं क्रान्तीवर आले असें दिसून येईल. उन्मत्त राजाना यतींनीं दूर करावें, नैतिक श्रेष्ठतेच्या लोकानीं दूर करावें असें सांगितलें आहे. अशा राजाना हिंसेनेंहि दूर करण्यांत येई. बेडूक राजा, दडुका राजा ( King Log and King Frog ) या गोष्टींत हें दाखविलें आहे कीं, लहान जुलूम दूर करायला जावें तर आणखी मोठा जुलूम डोक्यावर येऊन बसतो. एका हुकुमशहाला दूर करावें तर आणखी प्रबल हुकुमशाही जन्माला येते. असें होऊ नये म्हणून आपल्याकडे सौत्रामणियज्ञ सांगितला आहे. दंगलच माजली तर ज्याचा विजय होईल, ज्याच्या हातीं लष्करी सत्ता जाईल, तो सारी राज्यसत्ता बळकावून बसेल. शस्त्रबळाच्या प्राबल्यातून लोकशाहीच्या ऐवजी हुकुमशाहीच जन्माला यायची. ती हुकुमशाही शुद्ध राहील याचा काय भरंवसा? म्हणून सौत्रा-

मणियज्ञाचा संस्कार आपल्याकडे सांगितला आहे इंग्लंड-मध्ये चार्लसची चौकशी केली गेली. वाटेल त्यानें राजाला काढू नये. यति म्हणेल "मी काढतों." सारें शांतीनें व्हायला हवें. जुना राजा काढायचा, नवीन गादीवर बसवायचा परंतु हें दंगलीनें न करता, शिस्त, संयम, साधुता यानें व्हावें. नैतिक शक्तीच्या थोर नेतृत्वाखालीं असा सौत्रामणियज्ञ व्हावा, उन्मत्त राजाला दूर करण्याचा प्रयोग व्हावा.

### लोकशाहीच्या कल्पना

आता लोकशाहीच्या कल्पना आल्या आहेत आतां एखादा पक्षच्या पक्ष प्रबळ होऊन बसतो. त्या विशिष्ट पक्षाच्या हातीं सारी सत्ता एकवटते. अनिर्बंध, सर्वंकष सत्ता एक पक्षच हातीं घेऊन बसतो हा पक्ष जनतेच्या मनावर, शरीरावर जणू अत्याचार करतो. ही लोकशाही नव्हे असें होणें बरोबर नाहीं परंतु येथें क्रान्ति कशी व्हायची? लोकशाहींतील क्रान्ति शांतीनें व्हावी डोकीं फोडण्यापेक्षां डोकीं मोजणें बरें एकाच्या हातून सत्ता जेव्हा दुसऱ्याच्या हातीं जाते तेव्हा हिंसा होण्याचा संभव असतो. परंतु लोकशाही राज्यसंस्थेंत तिचा आळा असतो शान्ति, अहिंसा यांनीं राज्यक्रान्ति करण्याचा तेथें प्रयोग शक्य असतो जमनादासांच्या हातचीं सत्ता शान्तपणें बाळासाहेबांच्या हातीं आली याच शांतीच्या मार्गानें उद्यां बाळासाहेबांच्या हातून समाजवाद्यांच्या हातीं जावी. लोकशाहींत याला वाव आहे. वेळ लागेल, परंतु अवसर आहे. लोकशाहींत संघटनेचें, प्रचाराचें स्वातंत्र्य असतें मनुष्य आपल्या अंत प्रेरणेस

अनुसरून वागेल तर लोकशाही राज्यसत्तेंत अहिंसक क्रांतीस वाव आहे. म्हणून लोकशाही श्रेष्ठ आहे. परंतु लोकशाही अधिक यथार्थ व्हायला नैतिक बळ समाजांत वाढायला हवें. लोकशाहीचा पाया अहिंसेवर आधारलेला हवा. परंतु नैतिक बळ समाजांत वाढावें म्हणून, लोकशाहीचा अहिंसा पाया असावा म्हणून, समाजघटनेंतच आपणांस शिरावें लागेल. तें कसें तें पुढें पाहू.

---

## प्रवचन ४ थें

लोकशाही ही सत्य-अहिंसेच्या दृष्टीनें का श्रेष्ठ याचें विवेचन काल आपण सुरू केलें होतें. महात्मा गांधींना सत्याग्रहाच्या मार्गानें जी क्रान्ति घडवून आणायची आहे, तिच्यासाठीं लोकशाहींतील आधारभूत हक्क आवश्यक आहेत. गांधीजींच्या सत्याग्रहांतील मूलभूत कल्पना अशी आहे कीं, प्रत्येक व्यक्तीला आपल्या मनोदेवतेच्या सांगीप्रमाणें, आज्ञेप्रमाणें बोलायचा हक्क आहे. या गोष्टीवर त्यांची लोकशाही आधारलेली आहे. एका व्यक्तीनें सत्यशोधन करावें आणि सर्वांनीं तें निमूटपणें मानावें ही गोष्ट गांधीजींस पसंत नाहीं, मान्य नाहीं. सत्य काय यासंबंधीं सर्वांचीं मतें निरनिराळीं पडलीं तर ज्यानें त्यानें आपल्या मनोदेवतेच्या आज्ञेप्रमाणें वागलें पाहिजे. असें करताना राज्यसंस्थेच्या कायद्यांचें उल्लंघन करणेंहि प्राप्त होईल, परंतु तें केलें पाहिजे. परमेश्वराचा आवाज दडपून टेवतां कामा नये. सद्-सद्विवेकबुद्धीच्या आवाजाची गळचेपी होतां कामा नये.

## गोंधळाचा आक्षेप व त्यावर उपाय

परंतु जो तो स्वतःच्या बुद्धीप्रमाणें वागू लागला तर अनवस्थाप्रसंग ओढवणार नाहीं का? समाजांत सारा गोंधळच नाहीं का माजणार? बजबजपुरी, जो तो बुद्धीच सांगतो असें नाहीं का होणार? असा आक्षेप घेतां येऊ नये म्हणून महात्मा गांधी तेथें अहिंसेचा आधार घेतात. अहिंसेचा आधार येथें अवश्य आहे. स्वतःच्या मनोवृत्तीप्रमाणें वागण्याचा, राज्यसत्तेचें उल्लंघन करण्याचा हा हक्क तुम्हाला दिला, परंतु त्याचबरोबर समाजांतील हिंसावृत्ति नष्ट करण्याची जबाबदारी हि तुमच्यावर टाकलेली आहे. कायदेभंग हा सविनय आहे. सविनय कायदेभंगाचा हक्क जन्मसिद्ध आहे. हें तत्त्व सनातन आहे, सर्वकालीन आहे. जोंपर्यंत तुम्ही हिंसेला उत्तेजन देत नाहीं, तोंपर्यंत स्वमतप्रचार करा, कायदाहि मोडा. परंतु राज्यकारभारांत दवडादवळ माजवू नका. गांधीजींना लोकशाहींत हें शक्य वाटतें म्हणून त्यांना लोकशाहीचें आकर्षण वाटतें. लोकशाहींत मनाप्रमाणें विचार करण्याचा, आचार करण्याचा, प्रचार करण्याचा, अहिंसेचा सार्वभौम मर्यादा सांभाळून हक्क आहे. परंतु सर्वंकष हुकुमशाहींत हें शक्य नसतें. तेथें राज्यसत्तेच्या विरुद्ध कांहीं करताच येत नाहीं. विरुद्ध विचाराच्या लोकांना तेथें संघटना-स्वातंत्र्य नसतें. प्रचार, प्रसार, कांहींहि करतां येत नाहीं. प्रस्थापित राजकीय पक्षाविरुद्ध हुकुमशाहींत कांहींहि करायला अवकाशच नसतो. प्रस्थापित राज्यसत्तेच्या विरुद्ध जी विचारसरणी, तिला तेथें प्रभावी व्हायचें असेल तर शस्त्रबळाशिवाय तें शक्य नसतें. ट्रॉट्स्कीला मतप्रचारस्वातंत्र्य

नव्हतें, म्हणून तो हिंसेच्या मार्गाकडे वळला. परंतु त्यालाच प्रबळ सत्तेनें हांकलून लावलें, हद्दपार केलें. परंतु या गोष्टी लोकशाहींत चालू ठेवणें विसंगत दिसेल. लोकशाही घटनेंत सत्यसंशोधनास अधिक वाव आहे असें महात्माजींना वाटतें. म्हणून त्याना ती पसंत आहे लोकशाहींत वर वर तरी कां होईना सत्य, अहिंसा याना स्थान आहे. मतप्रचाराचें स्वातंत्र्य असावें, असलें पाहिजे आपला हा जन्मजात हक्क आहे

सर्वांना मताधिकार मिळाला एवढयानें लोकशाही आली असें नाहीं. मताधिकार मिळणें म्हणजे मतें बनवण्याचाहि अधिकार असणें होय. मी प्रचार करीन, लोकाचीं मतें बनवीन अशी परवानगी नसेल तर मताधिकार मिळून काय फायदा ? राज्यसत्तेचें जें मत तेंच लादणें म्हणजे लोकशाही नव्हे. नुसता वर वर सर्वांस मताधिकार असून भागत नाहीं. एवढयानें लोकशाही पुरी होत नाहीं. मतप्रचारास, मतें बनवण्यास वाव नसेल तर ती एका पक्षाची अनियंत्रित सत्ताच म्हणावी लागेल सार्‍या समाजाला एखादें वळण सक्तीनें देऊं पाहणें म्हणजे हिंसा होय. बौद्धिक उन्नति, आत्मोन्नति ही का एकाद्या पक्षानें स्वेच्छेनें सार्‍या समाजावर आपल्या कल्पनेप्रमाणें लादायची असते ? लोकशाहींत या गोष्टीला स्थान नाहीं. लोकशाहींतहि कांहीं मर्यादा घालाव्या लागतात, घालाव्या लागतील समूहाला मर्यादा घालावी लागेल आजच्या लोकशाहींत अजून नवसमाजनिर्मितीस वाव नाहीं. नफा हा मूलभूत हक्क मानला जातो त्या नफ्याला कोठें मर्यादाच नाहीं. संपत्ति कोणी किती हि भोगावी, स्त्रीहि गोळा करावी कोण

वाळणार तेथें मर्यादा [2] सर्वांना सारखी संपत्ति ही अशक्य गोष्ट आहे असें प्रतिपादण्यात येतें.

### अमर्याद भांडवलशाहीतून वर्गकलह

परतु अशा अमर्याद भाडवलशाहींतून वर्गकलह जन्मणार. समाजात निर्धन आणि सधन दोन वर्ग होणार त्याचा मग भीषण संग्राम अपरिहार्य होतो संग्रहवुद्धि, नफेबाजीची वृत्ति जर मोकाट सोडली तर समाजात शान्ति-समाधान कशीं येणार ? त्या समाजाचें स्थैर्य कसें राहणार ? तेथे उत्पात होतील, रक्ताळ क्रान्ति होईल. या संग्रही वृत्तीस, नफेबाजी वृत्तीस पुन्हा तुम्ही कायद्यानें संमति देता ! ही कायदेशीर शोषणाची वृत्ति भयंकर आहे.

### दुसऱ्याच्या श्रमांतून घेतो तो चोर

आपण एक प्रकारें चोरीलाच अशा प्रकारानें कायदेशीरपणा देत असतों. दुसऱ्याच्या श्रमातून, घामातून निर्माण होणारें धनधान्य बळकावून बसणारे चोर आहेत. गीता म्हणतेः " स्तेन एव सः " अरे, तो खरेंच चोर आहे. यज्ञ न करता, त्याग न करता, श्रमणाऱ्यांची झीज भरून न काढता, त्याचे संसार सुखाचे न करता जो उपभोग घेतो तो चोर आहे असें गीता स्पष्टपणें सागत आहे सज्जन कोणाला म्हणावें, त्याची व्याख्याहि बदलावी लागेल. कायद्याप्रमाणें वागतो तो सज्जन नव्हे. कारण कायदेशीर असे जे मार्ग आहेत, त्यात चोरीचेहि आहेत. नैतिक मर्यादा पाळणारा तो सज्जन. कायद्याची दृष्टि आज नीतीची असतेच असें नाहीं. आजची लोकशाही राज्यसंस्था त्या दृष्टीनें अपुरी आहे. ती अन्याय्य पिळणुकीसहि वाव देते. म्हणून ती सत्या-

धिष्ठित नाहीं, अहिंसकहि नाहीं असत्यावर, अन्यायावर आधारलेली असल्यामुळें तिला हिंसेचा आधार घ्यावाच लागतो. अशी लोकशाही ही आदर्श लोकशाही नाहीं. महात्मा गांधींना अहिंसक लोकशाही हवी आहे त्या लोकशाहींत संग्रहवृत्तीस आळा घालावा लागेल, मर्यादा घालाव्या लागतील. समाजवादाशीं अनुरूप असें सरकार अशा लोकशाहींत असेल.

## असंग्रहाचें तत्त्व

असंग्रहासंबधीं लिहिताना ते म्हणतातः " असंग्रहाचें तत्त्व अमलात आणण्याचा प्रयोग सक्तीनें करता येईल असें मला वाटत नाही. " कारण सक्तींत हिंसा येणार हिंसा तर गांधीजींना अमान्य. " आपल्या देशाचें भवितव्य " या लेखात ते म्हणतात " बोल्शेव्हिझम मला मान्य नाहीं खाजगी मालमत्ता सक्तीनें नष्ट करणें मला मान्य नाही मला अर्थशास्त्रात असंग्रहाचें नैतिक तत्त्व दाखल करायचें आहे. लोकाना हें सुंदर तत्त्व अहिंसेच्या मार्गानें, शान्तीच्या मार्गानें पटवता आलें तर किती छान होईल ! परंतु सक्तीनें मामुदायिक मालकी प्रस्थापूं पहाल तर ती टिकणार नाहीं कारण हिंसेवर आधारलेलें काहींच टिकत नसतें ते तात्पुरतें असतें. राज्यसंस्थेला सक्तीनें सारें करण्यात चिरस्थायी यश येणें अशक्य आहे म्हणून शान्तीच्या मार्गानेंच असंग्रह येऊ दे. जे कोणी त्याग करतील, त्यांचीं उदाहरणें स्फूर्ति देतील. त्या थोड्या महाभागाची ध्येयशक्ति वाया जाणार नाहीं. अशा मार्गानें जाण्यात हिंसा कमी होईल. " हिंसेनें झटपट फरक पाडणें गांधीजींना पसंत नाहीं. असंग्रहाचें तत्त्व समा-

जात मान्य झाल्याशिवाय समाजात अहिंसा कधींच येणार नाहीं. परंतु हा असंग्रह कसा यायचा, कसा आणायचा ?

### महात्माजींचा मधला मार्ग

एकवर्ग समाज निर्मिणें आणि कष्टाशिवाय कोणी खाऊं नये हीं दोन तत्त्वें घेऊन महात्माजी अहिंसक लोकशाही उभारूं पाहतात. सारी संपत्ति श्रमातूनच निर्माण होते. ती एकानें बळकावणें पाप आहे. खऱ्या लोकशाहींत मतस्वातंत्र्य, विचारप्रसारस्वातंत्र्य, याबरोबरच असंग्रहाचें सार्वभौम तत्त्व हवें. अशी लोकशाही आज आहे कोठें ? ती निर्मायची आहे. आजची राज्यसंस्था लोकशाही दिसली तरी ती भांडवलशाही आहे. भांडवलशाही लोकसत्ता अहिंसक राहूं शकत नाहीं. समाज सुखी करण्यासाठीं आर्थिक घटना बदलायला हवी.

### आर्थिक घटना

समाजात दोन मर्यादा आधीं घालायला हव्यात. गरिबी कोठवर सहन करावी ? या इतपत गरिबी असली तरी चालेल, परंतु याच्याखालीं तरी ती जाता कामा नये, अशी एक मर्यादा हवी. त्याचप्रमाणें जास्तींत जास्त श्रीमंती किती असावी याचीहि एक मर्यादा हवी. त्या मर्यादेच्या पलीकडे श्रीमंती गेली तर तें पाप होय, गुन्हा होय, असें झालें पाहिजे. अशा या दोन मर्यादांच्या आत साऱ्या समाजानें नांदावें. खालची मर्यादा नि वरची मर्यादा याच्या चौकटींत समाज बसवावा.

### *प्रायोगिक कल्पना*

समजा, पांच माणसांचें एक कुटुंब आहे. पति, पत्नी,

तीन मुलें. या सर्वांनीं किती काम करावें, त्यांना मोबदला किती मिळावा? कामाचीहि मर्यादा हवी. इतक्या तासाच्या वर काम कोणासच नसावें सुटी सोडून पुरुषास रोज साडे-सहा तास काम असावें सुटी धरून समजा आठ तास स्त्रियाना सुटी सोडून चार तास, सुटी धरून पाच तास स्त्रियाना गृहकृत्यात लक्ष देता यावें म्हणून त्याना कमी काम असावें आठ ते सोळा वर्षांपर्यंतच्या मुलानीं रोज एक तास उत्पादन काम करावें भी मोठा होईन, मग काम करीन असें नको प्रत्येकानें कांहीं तरी उत्पादन काम रोज केलेंच पाहिजे.

कुटुंबातील सर्वांनीं काम किती तास करायला हवे तें आपण पाहिलें त्याचबरोबर अशा कुटुंबाच्या कमीत कमी गरजा काय तेंहि आपण पाहिलें पाहिजे पैशाच्या स्वरूपा चाहि, आर्थिक अरिष्टें येतात त्या वेळेस, विचार करावा लागतो. कारण आजची रुपयाची किंमत उद्या नसते. या सर्व गोष्टी लक्षात घ्याव्या लागतात. आपण सर्वसाधारण शांततेचा काळ घेऊन एका कुटुंबाचा विचार करू या संसारांतील आवश्यक गरजा पुढीलप्रमाणें असतात

१ पोटभर अन्न हवें यात दूध, तूप, तेल, मीठ, मसाला, थोडीं फळें, इत्यादींचा अन्तर्भाव हवा

२ शरीररक्षणार्थ कपडे, कांबळी, रजई, मच्छरदाणी, मारण, तसेंच दिवाबत्ती, भांडीकुंडी, वगैरे.

३ मनाच्या आनंदासाठीं, विकासासाठीं शिक्षक, वर्तमान पत्रें, पुस्तकें इत्यादि.

४ रहायला घर, गुराढोरांसाठी गोठा वगैरे

अशा आवश्यक गरजा भागायला हव्यात. एवढयानें प्रत्येकाला मी सुखसपन्न असें म्हणता जरी आलें नाहीं तरी कमींत कमी इतकें तरी मिळायला हवें. प्रत्येक महिन्याला नवरा, बायको, तीन मुलें एवढया कुटुंबाला कमींत कमी पूर्वीच्या हिशेबानें ३७॥ रुपये तरी घरायला हवेत. पुरुषाची मजुरी महिना २१॥ रुपये, स्त्रीची १३॥ आणि मुलाची ३॥ रुपये, मिळून महिना ३७॥ होतील. ही किमान मर्यादा झाली. इतके तरी रुपये मिळायलाच हवेत. (युद्धपूर्वकालीन ३७॥ रुपये) किमान मर्यादा ठरली; कमाल मर्यादा कोणती ? ३७॥ रुपये दरमहा म्हणजे वर्षाला ४५० रुपये झाले. याच्या पंधरापट कमाल मर्यादा ठरवावी. मनुष्यानें जास्तींत जास्त वार्षिक उत्पन्न किती घेतलें तर चालेल ? तर किमानाच्या पंधरापट एवढें कमाल उत्पन्न क्षम्य धरावें. मनुष्यांतील उद्योगवृत्तीस, साहसास, महत्त्वाकांक्षेस वाव हवा. त्याला प्रोत्साहन हवें. सारेच संत, केवळ समाजासाठीं आपली सारी शक्ति देणारे कोठून आणायचे ? म्हणून थोडी सूट ठेवू या. स्वार्थाला थोडी मोकळीक ठेवूं या. मला अधिक मिळेल तरच मी अधिक उत्पादन करीन, माझी सर्व शक्ति कामीं आणीन असें म्हणणें बरें नाहीं. परंतु समाजांत, व्यवहारात ही वृत्ति आहे, म्हणून थोडी सवलत देऊं या. प्रत्येकास मोटार नको, परंतु प्रत्येकास पोटभर अन्न मिळून आवश्यक गरजा भागून मग कोणाजवळ मोटार असली तर ती डोळ्यात सलत नाहीं. परंतु इकडे खायलाहि नाहीं आणि तिकडे मोटारी, इतकी विषमता असह्य होते. म्हणून आपण असा मधला मार्ग धरूं या. किमान वार्षिक ४५० तर कमाल टोंक ४५०×१५.

हीं दोन टोकें आपण ठरवून याच्यामध्यें सारी समाजरचना वसवूं. पंधरापटींहून, वार्षिक ६७५० रुपयांहून अधिक जवळ असणें ऐषआरामाने जाईल. ऐषआराम नको. अशा प्रकारें वार्षिक किमान ४५० आणि कमाल ६७५० याच्यामध्यें राहणारा एक वर्ग आपण निर्माण करू. कोट्याधीश येथें नाहींत, अगदीं निर्धनहि नाहींत. एकवर्ग समाज जणु होईल. थोडी विषमता असली तरी ती सुसह्य होईल. भौतिक संग्रहाला मर्यादा घालण्याचें तत्त्व मान्य केल्याशिवाय लोकशाही चाड शकणार नाहीं. सत्य, अहिंसा येऊं शकणार नाहींत. गांधीजी म्हणतात, " मीहि समाजवादी आहें; परंतु लोकशाही समाजवाद मला हवा आहे. मी अहिंसक समाजवादी आहे. त्या अहिंसेच्या दृष्टीनें जें जें जरूर तें तें मी करीन. " अधिकारानंतरहि अहिंसेनेंच सारें करायचें. एका पक्षाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं सत्ता जायची असेल तरी ती अहिंसेनें जावो. इंग्रजानीं कायद्याची सत्ता निर्माण केली. कायद्याच्या बंधनानीं बद्ध करून इंग्रज बोलत असतो. गांधीजी सविनय प्रतिकार, सविनय कायदेभंग हा जन्मसिद्ध हक्क आहे असें मानतात. इंग्रज सारें कायद्यानें करू इच्छितो; परंतु गांधीजी सविनय कायदेभंगाच्या हत्यारचेंहि समर्थन करतात. त्यांच्या असहकारांत सविनय कायदेभंगहि आहे. परंतु हें सारें नम्रतेनें, अहिंसेनें ते करूं इच्छितात.

## महात्माजींचें क्रांतिशास्त्र

महात्माजींच्या क्रान्तिशास्त्राच्या मांडणींत दोन गोष्टी आहेत. १ असहकार, २ कायदेभंग

दोन्ही मिळून त्यांचे अहिंसक क्रान्तिशास्त्र पूर्ण होतें क्रान्ति यशस्वी होण्याच्या दृष्टीनें या दोन्ही गोष्टी हव्यात. राज्यसत्ता उलथून पाडण्याच्या दृष्टीने असहकार अधिक प्रभावी आहे. कायदे न मोडता असहकार करणें ही गोष्ट अधिक निरुपद्रवी असून अधिक परिणामकारक आहे. सविनय कायदेभंग करणारास देहदड, क्लेश भोगणें प्राप्त असतें त्यापेक्षा केवळ असहकारात त्रास कमी असून परिणाम पुन्हा अधिक आहे. आपल्याला आपल्या देशातील लढयात असें दिसून येईल कीं, सविनय कायदेभग करणारे सरकारशीं, परकी सरकारशीं सहकार करीत आहेत कायदेभंग करून तुरुगात येतात, तर तिकडे शेतसारा, प्राप्तीवरील कर भरीत असतात. इकडे तुरुगात येतील तर तिकडे *कारखान्यातून सरकारला माल पुरवीत असतात !* म्हणून जोंपर्यंत परकी सरकारशीं असहकार नाहीं तोंवर क्रान्ति नाहीं. असहकार कायदेभगापेक्षा निरुपद्रवी असून अधिक प्रभावी आहे असहकारात परकी सरकारला खरा धोका आहे असहकारानें सारा सरकारी गाडा आपण बद पाडू शकतों आपण सरकारला आव्हानपूर्वक सागतों कीं, " अन्याय वद करा, न्याय प्रस्थापा, असें न कराल तर तुमचें राज्ययत्र वंद पाडू. राष्ट्रव्यापी असहकार करू, याद राखा. " पोलीस, लष्कर, सर्वत्र जर असहकार शिरला तर सारें राज्ययत्रच वद पडतें गाडयाला खीळ पडते असहकारात अपार शक्ति आहे. फार भयकर आहे हें अहिंसक साधन सविनय कायदेभग करून आपण आत्मक्लेशानें शत्रूचें हृदय परिवर्तवू पाहतो असहकारात कायदा मोडीत

नसलों तरी राज्ययंत्रच बंद पाडतों. कायदा पाळणें म्हणजे सहकार, कायदा मोडणें म्हणजे असहकार असें असलें, तार्किक निष्कर्ष जरी असा असला, तरी कायदे न मोडता होणारा असहकार हा कायदे मोडण्यातच एका अर्थी परिणत होतो. कायदेभंग आणि कायदेभंग न करता केलेला असहकार दोन्ही एकरूपच आहेत.

### कायदेभंगाचें द्विविध रूप

गांधीजींच्या कायदेभंगाचें रूप द्विविध आहे. संरक्षक आणि चढाऊ किंवा आक्रमक. जो अन्यायी कायदा असेल तेवढाच मोडणें हा संरक्षक भाग. नागरिकत्वाचे मूलभूत हक्क काय याचीहि आधीं स्पष्ट जाणीव हवी. सरकार मूलभूत हक्कावर गदा आणील तर कायदेभंग करायला हवा. त्या विशिष्ट हक्काच्या रक्षणार्थ हा कायदेभंग त्या विशिष्ट गोष्टीपुरताच असेल. समजा, भाषणबंदी असेल तर भाषण करून कायदा मोडणें. सभाबंदी, प्रचारस्वातंत्र्यबंदी, लेखनबंदी इत्यादि गोष्टी नागरिक हक्कावर गदा आणणाऱ्या आहेत. अर्थात् अहिंसक रीतीनें आपण सारें केलें पाहिजे. अहिंसक रीतीनें प्रचार करायलाहि बंदी झाली तर तेथें मूलभूत हक्कावरच हल्ला आला. तेव्हा तेवढ्या गोष्टीपुरता कायदेभंग करायचा. त्या विशिष्ट गोष्टीपुरता कायदेभंग करणें म्हणजे संरक्षक कायदेभंग. परंतु सरकारनें एक अन्याय केला, तर त्या अन्यायाच्या दूरीकरणार्थ सर्वच बाबतींत कायदेभंग सुरू करणें याला चढाऊ किंवा आक्रमक कायदेभंग म्हणायचें. शेतसारा डोईजड आहे म्हणून तो नाकारणें हा संरक्षक कायदेभंगः परंतु इतर अन्याय दूर करण्यासाठी इकडे शेतसाराहि नाकारणें म्हणजे चढाऊ

कायदेभग सपूर्णपणें सर्वत्रच कायदेभग सुरू करणें म्हणजे उघड बडच होय अर्थात् हें अहिंसक, अनत्याचारी बड आहे सपूर्ण असहकारानेंहि राज्यतत्र वद पडतें सपूर्ण कायदेभंग म्हणजेहि बड होतें दोहोंतहि अहिंसा आहे सरकारी कायदे मी मोडीन, परतु नीति मी सोडणार नाहीं. सरकारी कायद नीतीला धरून नाहींत म्हणून तर माझा असहकार, माझा कायदेभग नैतिक कायदा हा शासनसस्थेच्या कायद्यापेक्षां श्रेष्ठ आहे. सत्याग्रही नैतिक कायद्याचा पुजारी असतो, अनैतिक नि अन्याय्य कायद्याचा झुगारी असतो नैतिक कायदा पाळणें म्हणजेच पुरा कायदा पाळणें

## यतिधर्म नि राजधर्म

यतिधर्म नि राजधर्म यात फरक असा कीं, यति कधींच हिंसा करणार नाहीं परतु सत्यस्थापनेसाठीं, न्यायस्थापनेसाठीं राजधर्मांत मर्यादित हिंसा सांगितली आहे. न्यायप्रस्थापनेसाठीं राजधर्मांत हिंसेला मुभा दिली आहे ती हिंसा शास्त्रोक्त आहे त्याला शास्त्रोल्लघन करण्याचा अधिकार नाहीं त्यानें हिंसाहि सोडता कामा नये क्षत्रियानें क्षत्रियधर्म तर सोडायचा नाहीं, मग हिंसा कशी सोडायची ? परतु यतीनें सत्य-अहिंसा सांभाळून वाटेल तें सोडावें सारे विधिनिषेध, सारे शास्त्रार्थ त्यानें गुडाळून ठेवावे सारे नियम सत्य नि अहिंसेच्या पोटात येतात जो सत्याग्रही आहे, अहिंसक सत्याग्रही आहे, तो इतर सर्व धर्म सोडून सत्यासाठीं उभा राहतो " सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज " यातील हाच भावार्थ आहे आणि खरें पाहिलें, आजवरचा अनुभव पाहिला तर अखेर असेंच दिसेल हिंसेनें

सत्याची स्थापना होत नाहीं. असत्य व हिंसा यानीं समाजात सत्य नि अहिंसा कशीं कशीं येणार ? म्हणून अहिंसेलाच बंड करण्याचा अधिकार गांधीजी देऊ पाहातात यतिधर्मांत सारें सहन करायचें. गांधीजी त्यांत प्रतिकार ओतूं इच्छितात. अहिंसकशक्ति प्रतिकाररूपानें, बंडाच्या स्वरूपात ते उभी करूं इच्छितात. कारण हिंसक बंडातून, हिंसक क्रान्तींतून पुन्हा निराळ्या स्वरूपात हिंसाच सत्तारूढ दिसते. मतपरिवर्तन करून कायदे बदला यात लोकशाहीचा प्राण आहे. परंतु मतपरिवर्तन करायला मी आत्मक्लेशांहि भोगीन. कायदा अहिंसक रीतीनें मोडून तदर्थ होणारी शिक्षा भोगून मी माझ्या आत्मबलानें मतपरिवर्तन करूं इच्छितों. मानवाचा हा जन्मसिद्ध हक्क आहे असें गांधीजी म्हणतात. पाश्चिमात्य राजनीतिज्ञ ही गोष्ट कबूल करीत नाहींत. मानवाचा हा अभिजात हक्क आहे अशी कबुली द्यायला पाश्चिमात्य तयार नाहींत. ते म्हणतात, अशानें क्रान्ति होईल गांधीजी म्हणतात, " होऊ दे. " जी राज्यसंस्था अन्याय करील, तिचें लोकमताचें अधिष्ठान काढून घेतलें पाहिजे. ती चालता कामा नये. ती राज्यसंस्था म्हणेल कीं, बेकायदा वागायचा तुम्हाला अधिकार नाहीं. मी म्हणेन आहे; जोंपर्यंत अहिंसक तोंवर आहे. मी हिंसेनें विरोध करणार नाहीं. हिंसेनें जाणारे जावोत; माझा मार्ग अहिंसेचा. मीं कायदा मोडला तर मला शिक्षा करतील मी ती भोगीन, परंतु स्वस्थ नाहीं बसणार. जनतेच्या नागरिक हक्कांची गळचेपी निमूटपणें मी सहन नाहीं करणार. मी अहिंसक रीतीनें त्या कायद्यांना विरोध करीन. मला न्यायालयासमोर खेंचतील. हा बटयोर

आहे असें म्हणून माझ्यावर खटला भरतील. भरोत. मी सांगलच राहणार कीं, जोंपर्यंत मनुष्य अहिंसक प्रचार करीत आहे तोंवर त्याच्या नागरिक हक्कावर गदा येतां कामा नये. कॉंग्रेसमंत्र्यांनीं अहिंसक रीतीनें प्रचार करणाऱ्यांवर खटले भरूं नये, त्याचे नागरिक हक्क हिरावून घेऊं नये. अत्याचार करणारे कोणी असतील तर त्याची गोष्ट निराळी. मी क्रान्तिकारक आहे. सरकारविरुद्ध अहिंसक रीतीनें अप्रीति उत्पन्न करण्याचा माझा जन्मजात हक्क आहे. हिंसक क्रान्ति समाजात यावयास नको असेल तर अहिंसक रीतीनें दाद मागणाऱ्यांस, अहिंसक रीतीनें चळवळ करणाऱ्यास मुभा द्यायला हवी समाजव्यवस्था वा राज्यव्यवस्था कायम स्वरूपाची कधींच नसते. परिस्थित्यनुरूप फेरबदल करावे लागतात. विधिनिषेध, संकेत बदलावे लागतात. गांधीजी रूढ अर्थानें सनातनी नाहींत; परतु ते खऱ्या अर्थानें स्वतःला सनातनी म्हणवतात. सनातनी शब्दाचा खरा अर्थ " सनातनो नित्यनूतनः " असा आहे. जो बुद्धीप्रमाणें वागतो, काळाची गति ओळखून वागतो तो सनातनी. आज रूढीच्या भक्तांना, जुन्याला चिकटून बसणाऱ्यांना आपण सनातनी म्हणतों. गांधीजी जेव्हा स्वतःला सनातनी म्हणतात तेव्हा ते जुन्या अर्थानें नाहीं म्हणत. ते तर बंडखोर आहेत. ते म्हणतात, " महाभारताचा कर्ता वेदव्यास यांच्या अर्थानें मी सनातनी हिंदु आहें! व्यासांनीं लक्षावधि लिहून सार काय सांगितलें ? व्यास महर्षि म्हणतात कीं, तराजूच्या एका पारड्यात राजसूय यज्ञ, अश्वमेध यज्ञ, इत्यादींचें वजन टाका आणि दुसऱ्या पारड्यात सत्याचें टाका.

काय दिसेल ? सत्याचें पारडें जड आढळेल. " याचा अर्थ हा कीं, बाह्य कर्मजडाचा पसारा, हीं यज्ञादिक कर्में यांना तादृश महत्त्व नाहीं महत्त्व सत्यनिष्ठेला आहे. रूढी, विधि-निषेधाचीं अवडंबरें याना नाहीं विधिनिषेध एके काळीं सत्य, अहिंसेसाठींच होते परंतु परिस्थिति बदलल्यावर ते कुच-कामी होतात महात्माजी प्रत्येक क्षणीं सत्याचें चिंतन करतात ते म्हणतात, मी पावलोपावलीं क्षणश कणश सत्यसंशोधन करणारा आहें, आणि म्हणून मी सनातनी आहें एकदा एकानें गांधीजींना प्रश्न केला, ' तुमच्या वर्तनांत अत्यन्त विसंगतिहि दिसते " ते म्हणाले " अत्यन्त विसंगत, परंतु एका अर्थी तें अत्यन्त सुसंगत आहे कारण त्या त्या वेळेस मला जें सत्य वाटतें तें मी बोलतों. या सर्व विसंगतींतून सत्याचा एक सुसंगत शोध आहे " सत्याचें ज्ञान कोणाल्याहि व्यक्तीला पूर्णपणे कधींच होत नसतें अवतारी पुरुष घेतला तरी त्याचेंहि सत्याविषयींचें ज्ञान कांहीं अशीं अपूर्णच असणार असें गांधीजी म्हणतात ऐतिहासिक राम, कृष्ण अपूर्ण आहेत काल्पनिक, ज्ञानमय श्रीकृष्ण पूर्ण आहे तो ऐतिहासिक प्रत्यक्ष व्यवहारांत वावरणारा श्रीकृष्ण त्यावेळच्या इतरांच्या मानानें पूर्ण होता परंतु संपूर्ण सत्याच्या दृष्टीनें तो अपूर्णच. सत्यसंशोधन हें सारखें चालू असावें लागतें, तें पुढें पुढें नेत असतें, नवीन नवीन दर्शन घडवीत असतें. बुद्धीला प्राप्त होणारे सिद्धान्त, त्यांचें स्वरूप बदलतें आपल्याला चुका दिसू लागतात जसजशी पूर्णतेकडे अधिकाधिक प्रगति होईल, तसतशी मत्यदर्शनाची अधिकाधिक प्रचीति येईल म्हणून

सत्याची उपासना करणारा निसर्गानें वागरत नाहीं. याची विसंगति विकासाची खूण असते शाश्वत सत्याचें चिंतन करीत तो वागणार. सत्य, अहिंसा यांच्या आविष्कारासाठीं विधिनिषेध बदलावे लागतात. क्रान्ति करावी लागते ही क्रान्ति कशी करावी याची नीट कल्पना येईपर्यंत क्रान्ति शब्द गांधीजींनी वापरला नाहीं. परंतु पुढें त्यांना स्वतःच्या अहिंसक क्रान्तीचें संपूर्ण दर्शन झालें ते म्हणाले " माझा क्रान्तिमार्ग, माझें क्रान्तिशास्त्र सर्वश्रेष्ठ आहे. " प्रजा जोंपर्यंत अहिंसक आहे तोंपर्यंत तिला क्रान्तीचा हक्क आहे. एखादा अन्याय जाला म्हणून तिनें अहिंसक प्रतिकार करावा पूर्वी ह्या गोष्टी यति करीत अहिंसेनें क्रान्ति कशी करावी हें यतींनें आता सर्व समाजाला शिकविलें पाहिजे. अहिंसक क्रान्तीचें तत्त्व व्यक्तीपुरतें न ठेवतां सर्व समाजांत फैलावलें पाहिजे आणि जनतेची शक्ति अहिंसक रीतीनें जागृत करून राज्यसत्तेकडून होणारा अन्याय दूर केला पाहिजे अहिंसा न सोडता असें हें राजकारण करायचें आहे

गांधीजी जेव्हां सत्य म्हणतात तेव्हा त्याचा अर्थ काय असतो ? आपण या गोष्टीचा थोडा विचार करू या. सत्यासंबंधींच्या दोन कल्पना असतात

१ वस्तुस्थितीचें ज्ञान, जें दिसतें तें खरोखर तसें आहे कीं भिन्न आहे हें समजून घेणें

२. दुसरी गोष्ट म्हणजे जें खरोखर आहे तें चांगलें आहे कीं वाईट आहे हें समजून घेणें.

सत्यसंशोधनाच्या मार्गांत खरें काय, खोटें काय, त्याचप्रमाणें सत् काय, असत् काय याचाहि विचार येतो आपण

सत्याग्रह करतों समाजातील वस्तुस्थितीचें सत्यस्वरूप समजून घेऊन तेथें अन्याय दिसतो म्हणून आपण सत्याग्रह करतों. न्याय काय, अन्याय काय, याचीहि स्पष्ट जाणीव आपणास लागते. काय आहे एवढें जाणून भागत नाहीं, तर काय असावें याचीहि जाणीव असयला हवी. परतु आदर्शस्थिति कशी असावी हें कळायला अतःशुद्धिहि लागते. काय आहे हें समजायला आणि कसें असावें हेंहि समजायला अतःकरण शुद्ध असावें लागतें. कारण जें खरोखर समोर आहे तेंहि विकृत दिसूं नये म्हणून दृष्टि निर्मळ हवी मलिन मनाला शुद्ध वस्तुस्थितिहि विकृत दिसते. बुद्धीचा आग्रह आला, विशिष्ट दृष्टीनेंच आपण पाहूं लागलों कीं सारें निराळेंच दिसणार. अमुक अमुक असें आहे, तें असेंच असणार, असा पूर्वग्रह धरून जेव्हा मनुष्य पाहू लागतो, तेव्हा त्याला वस्तुस्थिति विपरीतच दिसणार. जशी दृष्टि तशी सृष्टि. सत्याचें आकलन व्हायला मन पूर्वग्रहरहित हवें. गढूळ पाण्यांत सूर्याचें प्रतिबिंब पडत नाहीं, त्याप्रमाणें पूर्वग्रहानीं विकृत नि बरबटलेल्या बुद्धीत सत्याचें प्रतिबिंब कसें पडणार ? वस्तुस्थितीचें स्वरूप समजायलाहि शुद्ध मन हवें. मन धुवून काढलें पाहिजे. पाटीवर अक्षर उमटावें म्हणून आपण ती स्वच्छ करतों, त्याप्रमाणें सत्याचा साक्षात्कार व्हावा, सत्य हृदयावर लिहिलें जावें म्हणून हृदय घासून पुसून स्वच्छ केलेलें असायला हवें. प्रत्येक व्यक्ति पूर्वग्रहाच्या चष्म्यातूनच पाहाते त्यामुळें सत्य शुद्ध स्वरूपात न दिसता भलत्त दिसतें, विकृत दिसतें. काय आहे हें कळायलाहि जर शुद्ध बुद्धीची, निरंजन बुद्धीची आवश्यकता आहे, परि-

स्थितीचें सम्यक् दर्शन होण्यासाठींहि जर बुद्धि निर्मळ हवी, तर मग काय असावें, आदर्श काय याचें ज्ञान व्हायला तर अधिकच शुद्धता हवी ज्या मानानें बुद्धि शुद्ध असेल, त्या मानानें सत्याचें निर्मळ दर्शन घडेल. तुम्ही ज्या मानानें सत् त्या मानानें तुम्हास सत् कळेल, समजेल, सत्चें दर्शन होईल तुम्ही जितके असत् असाल, तितके सतापासून, सत् काय याच्या ज्ञानापासून दूर जाल. महात्माजी म्हणून आत्मशुद्धीवर जोर देतात सत्याग्रही सत्यासाठीं उभा राहतो. परिस्थितीचें सत्य स्वरूप आणि आदर्शाचें सत्य स्वरूप

" सत्येन सिद्धिरात्मनः "

सत्यानेंच सिद्धि प्राप्त होते. या सत्यात बाह्यज्ञानाबरोबर आत्मज्ञानाचाहि अन्तर्भाव असतो. हाच मोक्षाचा मार्ग. मायेतून पाहतो तोच खरा पाहणारा. त्याप्रमाणें परिस्थिती-वरचे पडदे फाडून तिचेंहि सत्य ज्ञान जो करून घेतो, आणि मनोबुद्धीवरचीं मलिन पुटें काढून जो स्वतःचेंहि स्वरूप समजून घेतो तोच मोक्षपदीं आरूढ होतो.

---

## प्रवचन ५ वें

काल आपण सत्यासंबंधीं बोलत होतों. वस्तुस्थितीचें संशोधन नीट व्हायला मन शुद्धीचीहि जरूर असते. परंतु वस्तुस्थिति समजून घेणें म्हणजे तरी काय ? वस्तुस्थितीचें सत्यस्वरूप असा शब्दप्रयोग जेव्हा आपण करतों, तेव्हा त्याचा अर्थ काय असतो ? सत्य म्हणजे काय हा विचार सुरू केला कीं त्यातून आपल्यासमोर दोन प्रश्न उभे राहतात.

१ आहे काय ?

२ काय असायला हवें ?

' आहे काय ' मध्यें जे प्रत्यक्ष असतें त्याचें आपण याथातथ्यानें वर्णन करीत असतों. जें समोर सर्वत्र दिसतें त्याचें निवेदन. भौतिक शास्त्रात या गोष्टीवरच अधिक भर देण्यात येत असतो. परंतु मनुष्य प्रयोगालयातून प्रत्यक्ष संसारांत जेव्हा येतो, खोली सोडून सारा व्यवहार पाहू लागतो, तेव्हा नुसतें काय आहे हें पाहून त्याला सत्य समजलें असें

म्हणता यावयाचें नाहीं समाजात वागताना आपण पदोपदीं कसें असावें, कसें वागावें, काय नसावें, कशात कल्याण — इत्यादि गोष्टी आपल्या डोळ्यासमोर उभ्या असतात. समाजात वागताना सदसद्विवेक करावा लागतो नुसतें वस्तुस्थिति-निवेदन करून भागत नाहीं. आणि भौतिक सृष्टींत निरीक्षण करताना सुद्धा काहीं ठिकाणीं वाइटाचा अनुभव येतो, काहीं ठिकाणीं चांगल्याचा हा देखावा सुंदर आहे असें आपण म्हणतों; हा देखावा अप्रसन्न आहे, हें दृश्य विद्रूप आहे असें आपण म्हणतों. आपण अमुक चांगलें, अमुक वाईट, हें सुंदर, हें कुरूप असें जेव्हा म्हणतों तेव्हा चांगलें काय, सुंदर काय यासंबधींची एक आदर्श कल्पना, पूर्णत्वाची कल्पना आपल्या मनात असते. मनातील कोणत्या तरी एका आदर्श कल्पनेच्या आधारानें आपण जगातील घडामोडीचें, या सर्व पसाऱ्याचें मूल्यमापन, योग्यायोग्यत्व ठरवीत असतों आपणांस प्रथम वस्तूचें दर्शन घडतें. नंतर त्या वस्तूचें मूल्यदर्शन आपणास होतें. हें मूल्यदर्शन, परमात्मदर्शनाच्या आदर्श कल्पनेच्या आधारानेंच होत असतें जगातील वस्तूचें मूल्यमापन करीत असताना अस्पष्ट, अस्फुट अशी का होईना, परंतु काहीं तरी आदर्शाची कल्पना अंतःकरणात असतेच असते. आपण दोन माणसें पाहतों एकापेक्षा दुसरा चांगला, अधिक श्रेष्ठ असें आपण म्हणतों. ज्या वेळेस असें आपण म्हणतों त्यावेळेस उत्कृष्ट मानवाचा एक आदर्श, श्रेष्ठ पुरुषाची एक ध्येयभूत कल्पना मनात असतेच. एरव्हीं आपण हा मनुष्य त्याच्यापेक्षा बरा असें म्हणू शकणार नाहीं. आदर्शाचें ज्ञान असल्याखेरीज मूल्यमापन आपण करू शकत

नाहीं. वस्तुदर्शन, मूल्यदर्शन, आदर्शदर्शन अशा त्रिविध वाटेनें आपण सत्याचें ज्ञान करून घेत असतों जी सृष्टि, जो समाज इंद्रियगम्य असतो, प्रयक्ष समोर ज्याचा अनुभव येतो त्याला आपण प्रत्यक्ष सृष्टि म्हणूं ती सृष्टि जी आपल्या ध्येयात असते, आपल्या कल्पनेंतील आदर्शांत असते तीं आपण परोक्षसृष्टि म्हणू दृष्टीच्या पलीकडची ती परोक्ष सृष्टि. आपण एखादें सुदर फूल बघतों. आपणास आनद होतो. परतु त्यात सौंदर्याची परिपूर्णता दिसत नाहीं. काहींतरी कमी आहे असें वाटतें. या फुलाहूनहि अधिक सुदर फूल असू शकेल असें जेव्हा आपण म्हणतों तेव्हा एक आदर्श फूल अलक्ष्यक्षूसमोर उभें असतें त्या अदृश्य पुष्पाशीं या प्रत्यक्ष पुष्पाची आपण तुलना करतों नि मग म्हणतों कीं, हें फूल सुदर असलें तरी तितकें नाहीं. आदर्शसृष्टि नेत्राना दिसत नाहीं, तरीहि हृदयांत तिची प्रतीति असते अशी प्रतीति नसेल तर आपणास बाह्यसृष्टि अपूर्ण अशी वाटतीचना. सृष्टीचें बाह्य निरीक्षण करताना निर्दोष अशा सृष्टीची आपणास सदैव कल्पना असते. ती जी चर्मचक्षूना न दिसणारी परतु हृदयात भासणारी, जिच्या प्रकाशान आपण जगाचें मूल्यमापन करतों, तीच सृष्टि वास्तविक खरी आणि इंद्रियगम्य अशी जी ही सृष्टि — जिला आपण खरीखरी म्हणून म्हणत असतों, तीच त्या आदर्श सृष्टीच्या प्रकाशात मिथ्या ठरते, माया ठरते ती जी निर्दोष, परिपूर्ण सृष्टि, तीच हळूहळू व्यक्त होत आहे. अशा प्रकारचे विचार तत्त्वज्ञानाच्या ग्रथातून माडलेले असतात. ज्याप्रमाणें आत्मभिन्न वस्तूत आपण आदर्श वस्तु आणि इंद्रियगम्य

वस्तु असा फरक करतों, तसा आत्म्यांतहि आहे. आदर्श आत्मतत्त्व आणि अहंकाराशीं संबद्ध असें शबल आत्मतत्त्व. मनुष्याची प्रत्यक्ष कल्पना, मनुष्याची आदर्श कल्पना. प्रत्यक्ष संसारांतील विकारी मनुष्य नि आदर्श सृष्टींतील ज्ञानस्वरूप मनुष्य. मनुष्याला स्वतःच्या विकारी रूपांतून मुक्त होऊन, या उपाधि सोडून, हीं बंधनें तोडून त्या निर्मळ आत्मरूपाकडे जाण्याची तळमळ असते. प्रत्येकाच्या अंतःकरणांत ही तळमळ असते. ही तळमळ तुम्हां आम्हां सर्वांना त्या आदर्शाकडे धडपडत जायला, त्या आपल्या परम सुंदर नि मंगल आत्मरूपाकडे जायला प्रवृत्त करीत असते, प्रेरणा देत असते. त्या आदर्शालाच आपण सत्यमय मानतों. आजचें आपलें अपूर्ण असें रूप आहे. त्याहून भिन्न असें तें जें अव्यक्त रूप तें व्यक्त करावें, तें आपल्या जीवनांत मूर्त करावें, अवतरवावें असें आपणांस वाटतें. या ध्येयासाठीं जी खटपट तीच आत्मप्राप्तीची खटपट, मोक्षार्थी माणसाची खटपट. त्या परोक्ष सृष्टीकडे, आदर्शसृष्टीकडे जायचे आपले सर्वांचे प्रयत्न असतात. ती सृष्टि, ती आदर्शसृष्टि जे अधिकाधिक जीवनांत आणतात, त्यांच्या उद्योगावरून आपणांसहि विश्वास वाटूं लागतो. त्या व्यक्तींना आपण श्रेष्ठ मानतों. यांच्याप्रमाणें आपणहि धडपडावें, यांच्याप्रमाणें आपण व्हावें असें इतर मुमुक्षूंच्या मनाला वाटूं लागतें. आपल्यापेक्षां श्रेष्ठ विभूति जेव्हां आपणांस दिसते, तेव्हां तिला आपण अवतार मानतों. ती परोक्ष कल्पना, तो अमूर्त आदर्श, तें कल्पनेंतील ध्येय या माणसांत मूर्त झालें आहे, येथें अपूर्णता पूर्ण रूपांत प्रकट झाली आहे असें वाटून आपणांस कृतार्थ

वाटतें. त्या इंद्रियातीत ध्येयाला आज आपण प्रत्यक्ष संसारात या व्यक्तीच्या स्वरूपानें वावरताना पाहात आहोंत, डोळ्यांना हें भव्य रूपडें दिसत आहे असें वाटून आशा दुणावते ती जी स्वर्गीय सृष्टि तिचें काहीं प्रतिबिंब अशा थोरामध्यें आपण पाहतों. मग आपण त्या व्यक्तीला अवतार मानतों. अवतार म्हणजे आदर्श सृष्टींतून प्रत्यक्षात आलेली आदर्श मूर्ति. सामान्यत दुर्भिळ असें तें परिपूर्णतेचें रूप, परंतु बऱ्याचशा अशानें तरी प्रत्यक्ष दिसनें किती छान ! आदर्श मानव, आदर्श आत्मा आपल्या अंत करणातच असतो. खिस्त म्हणतात, " स्वर्गाचें राज्य तुमच्यातच आहे, तुमच्या अंतरंगातच आहे ( Kingdom of God is within you ) त्या अंत करणातील आदर्श मूर्त दिसले तरीहि ते अपूर्णच असतात. प्रत्यक्षात येताना थोडी अपूर्णता येतेच म्हणून आपली नेहमीं प्रार्थना असते,

**असतो मा सत् गमय ।**

जें असत् आहे त्यातून तू मला जें सत् आहे तिकडे ने, अशी आपली सनातन आर्त प्रार्थना आहे. ज्याना आपण थोर पुरुष म्हणतों, त्यांचीहि हीच प्रार्थना असते मानवी जीवनास संपूर्ण ज्ञान, संपूर्ण निर्दोषता, केवळ परिपूर्णता अशक्य तिच्या जवळ जवळ आपण फार तर जाऊ प्रकाशाचा किरण माध्यमातून पलीकडे जाताना जसा थोडा तरी वक्र होतो, त्याप्रमाणें जीवनात आदर्श उतरवीत असताना थोडी तरी अपूर्णता येतेच. महात्माजींच्या विचारात ही गोष्ट नेहमीं दिसते जीवनाचा थोर आदर्श अशाच्या जीवनात प्रतीत होत असताहि त्याना अपूर्ण अपूर्ण असें का वाटतें ?

कारण पुढें जाणाऱ्या माणसाची, आदर्शाची कल्पनाहि वाढत जाते. समुद्रांत पुढें पुढें जावें तों तो पुढें अधिकच गभीर नि अथाग वाटूं लागतो. मनुष्य जसजसा उन्नत होत जातो, तसतशी मनुष्य किती उन्नत होऊं शकेल याची त्याची कल्पनाहि अधिक उंच उंच होत जाते. आपण त्याला अवतारी मानतों, पूर्ण समजतों. परंतु तो स्वतःला अपूर्णच समजत असतो. आणखी मोठें व्हावें, आणखी पुढें जावें, त्या आदर्शाच्या मानानें मी अजून कोठल्या कोठें आहे असेंच तो मुमुक्षु म्हणत असतो. आपणाला क्षितिज किती जवळ दिसतें. तें तेथें टेकलेलें आहे असें वाटतें. परंतु त्याला भेटायला म्हणून आपण जाऊं, त्याला हात लावायला जाऊं तर तें आणखी दूर जातें. अधिकच विशाल क्षितिज दिसूं लागतें. क्षितिजाच्या जसजसें आपण मागें मागें जाऊं तसें तसें तें आणखी आणखी पुढें जातें. क्षितिजाप्रमाणेंच आदर्श सृष्टीचें आहे. महात्मा गांधींची हीच वृत्ति आहे, हीच दृष्टि आहे.

### कृष्ण म्हणजे संपूर्ण ज्ञान

महात्मा गांधी कोणासहि पूर्ण मानीत नाहींत. त्यांनीं अनासक्तियोगाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहेः "कृष्ण म्हणजे संपूर्ण ज्ञान. संपूर्ण ज्ञानरूप कृष्ण भगवान् तो काल्पनिक आहे. तो प्रत्यक्ष कृष्ण — ज्याला आपण अवतारी मानतों तो झाला नसेल असें नाहीं. परतु संपूर्ण कृष्ण ऐतिहासिक नव्हे. संपूर्ण कृष्ण आदर्शांत आहे. ध्येयसृष्टींत आहे. ऐतिहासिक कृष्णावर त्या संपूर्ण कृष्णाचें आपण आरोपण केलें आहे. प्रत्येक जीव एका अर्थी ईश्वराचा, त्या आदर्श

त्याचींच आपण रूपें. परंतु जरी आपण सारेच लहानमोठे अवतार असलों तरी लौकिक भाषेंत तसें आपण म्हणत नाहीं. कारण पूर्णत्वाची, शुद्ध ज्ञानाची कल्पना आपल्या मनांत असते. जो पुरुष आपल्या काळांत सर्वश्रेष्ठ, धर्मवान् म्हणून आपणांस दिसतो, त्याची अवतार या नात्यानें आपण पूजा करूं लागतों. योगेश्वर कृष्ण म्हणजे शुद्ध पूर्ण ज्ञान, अर्जुन म्हणजे तदनुरूप क्रिया. हृदयांतील शुद्ध ज्ञानानुरूप कर्म करण्याची अर्जुनाची म्हणजे ऋजु माणसाची धडपड असते, प्रामाणिक माणसाची धडपड असते. जेथें अनुभवसिद्ध शुद्ध ज्ञान आणि तदनुरूप क्रिया हीं असतील तेथें वैभव, खरी नीति हीं असणारच असें गीता सांगते. शुद्ध ज्ञानच मनांत नसेल तर शुद्ध आचार तरी हातून होणार कसा? पूर्ण मनुष्य म्हणजे शुद्ध ज्ञान आणि तदनुरूप क्रिया. सत्य विचार, सत्य उच्चार, सत्य आचार अशा त्रिविध रूपांत जो सत्यमय असतो तो पूर्णत्वाचा पुतळा. त्रिविध सत्याचा जीवनांत साक्षात्कार हवा. माझा विचार सत्य हवा. तो सत्य आहे कीं नाहीं याची मनांत सारखी चिन्ता हवी. मनांत सारखें परीक्षण सुरू असायला हवें. मनाची प्रयोगशाळा कधीं बंद पडून उपयोग नाहीं. विचाराची सत्यता शोधायची, मग तें वाणीनें उच्चारायचें, आचारांत आणायचें. आपले विचार सत्य नसतील असें वाटलें तर त्याचीं कारणें शोधायचीं. कांहीं कारणें नैतिक असतात, कांहीं बौद्धिक असतात. त्यांचा उलगडा करायचा. दोष दवडीत रहायचें. सत्यसंशोधनाचा अखंड प्रयोग. जीवन

म्हणजे सत्यदर्शनाची, सत्यसंशोधनाची प्रयोगशाळा होय. भावनाशुद्धि पूर्ण झाली असें कधीं वाटतच नाहीं विचार शुद्धि पूर्ण झाली असें कधीं वाटतच नाहीं म्हणून अखंड सावधानता ठेवायची, अखंड यत्नवान असायचें त्या त्या वेळेस जें योग्य वाटेल तें करीत राहिलें पाहिजे. परंतु आज जें योग्य वाटत आहे तें योग्यच आहे ना यासंबंधींचा ध्यास सतत हवाच चिच्छक्ति, विचारशक्ति सारखी जागृत हवी. अधिकाधिक नवीन विचार मिळतात मनुष्याच्या बुद्धींत नवीन नवीन विचार निर्माण करणारें ज्ञान, हें येतें कोठून ? हें कोठून कसें मिळतें ? सामान्यत ज्याला आपण व्यवहारात बुद्धिमान् म्हणतों तो मनुष्य आणि आत्मशक्ति जागृत करून आपल्या बुद्धीला जागवणारा मनुष्य यांच्यात कोणता खरें फरक असतो ? सामान्य मनुष्य जेव्हा युक्तिवाद करतो, बुद्धिवाद लढवतो, त्या वेळेस त्याला स्वत च्या बुद्धीची मर्यादा, स्वत च्या मतींतील दोष या गोष्टी लक्षात येत नाहींत आपल्या मनाची एक लकब आहे कीं, एखाद्या गोष्टीचें समर्थन करायचें असतें म्हणजे *सारा युक्तिवाद तिच्यासाठी आपण करतों ही वकिली बुद्धि* असते पुष्कळ वेळा वकीलाला माहीत असतें कीं, आपल्या अशीलाची बाजू खोटी आहे परंतु तिच्या समर्थनार्थ तो सारी सृष्टि उभी करतो मुद्दे माडणारी एखादी बाजू घेऊन तदर्थ माडणारी बुद्धि ही कांहीं सत्यार्थी नसते तिनें माडलेलें, प्रतिपादिलेलें सत्य कांहीं खरें नसतें कोणाची तरी बाजू घ्यायची, पक्ष घ्यायचा नि भाडायचें असें अशा माणसाचें असतें सत्यार्थी मनुष्याची रीत अशी नसते. तो बुद्धिवाद

मागून करतो. तो आधीं सत्पक्ष कोणता हें समजून घेतो. खरोखर वस्तुस्थिति काय आहे, न्याय कोठें आहे हें तो बघतो सत्य कोठें आहे ते पाहिल्यावर, त्याची अंतःकरणात खात्री करून घेतल्यानंतर मग तें जगाला पटवण्यासाठीं सत्याग्रही मनुष्य बुद्धिवाद करतो. व्यवहारात आपण ज्याला बुद्धिवाद म्हणतों तें पक्ष घेऊन मांडणें असतें. तो वकिली बाणा, वकिली डावपेंच असतो. तेथें सत्य असतेंच असें नाहीं. खरें सत्य काय तें समजून घ्यावें आणि तें जगाला पटवावें असा तेथें प्रयत्नहि नसतो. व्यवहारात सामाजिक, राजकीय प्रश्न पदोपदीं येतात. तेथें सत्याचा अर्थ काय? सत्य म्हणजे सत्. प्रशस्ते कर्मणि निष्ठा. जें प्रशस्त कर्म आहे, हितकर आहे, तें आपलेसें करणें. सत् काय आहे हा प्रश्न सत्यार्थी विचारीत असतो. जें मला सत्य म्हणून वाटतें तें सत् आहे ना? सत्य सत् आहे की नाहीं हें कसें ठरवायचें? जें मला सत्य म्हणून वाटतें तें प्रशस्त, योग्य आहे की नाहीं? जें आपणास सत्य वाटतें तें सत् आहे कीं नाहीं याची एक कसोटी आहे

"यद्भूतहितमत्यन्तं एतत्सत्यम् मतं मम॥"

आत्यन्तिक भूतहिताच्या दृष्टीनें विचार करून सत्य काय तें ठरवायचें. सत्य काय, असत्य काय हें ठरवितांना जग कल्याणाची शाश्वतदृष्टि हवी. त्या दृष्टीचा उपयोग हवा. आत्महितासाठीं खोटेंहि बोलावें असें म्हणतात. म्हणजे सर्व-श्रेष्ठ आत्महित. आत्महित साधेल तर तें सत्य. तुमची कोण तीही लोकशाही असो. अमुक गोष्ट करावी कीं न करावी, अमुक कायदा करावा कीं न करावा, अमुक नियम हवा की

नको; कशावरून ठरवावयाचें ? आपण लोकशाहीत मत देतों. मत देताना कोणती दृष्टि हवी ? सावकारीचें नियंत्रण करावें की न करावें ? तुम्ही सर्व समाजाच्या दृष्टीनें विचार करा. सावकारानें फक्त सावकारवर्गाचें हित बघावें, कुळानें केवळ स्वतःच्या दृष्टीनें यामुळें सत्य दूर राहील. तुमच्या वर्गहितानें भूतमात्राचें हित साधणार आहे का ? इतर सटर फटर गोष्टी नको सांगूं ते आपापले वर्गीय अहंकार दूर ठेवून सर्व भूतमात्राच्या हिताच्या दृष्टीनें उत्तर द्या.

अमुक एक कायदा करताना, केवळ एखाद्या व्यक्तीचें किंवा एखाद्या वर्गाचें पाहून भागणार नाहीं. व्यक्तींचें हित हा प्रश्न नाहीं. सत्याग्रही व्यक्तीच्या दृष्टीनें व्यष्टीचें हित तें समष्टीचें असतें. माझ्या हिताची जी गोष्ट ती सर्व जगाच्या हिताचीहि असायला हवी समष्टीच्या म्हणजेच सर्व मानवाच्या हितातच आत्मकल्याण, स्वतःचें कल्याण असतें असें सत्यार्थी मानतो. जनतेची बुद्धि, सार्वजनिक बुद्धि, राष्ट्राच्या कायद्याच्या पाठीमागें असायला हवी असें आपण लोकशाहीचे पुरस्कर्ते म्हणत असतों. " General will " सर्वांची बुद्धि असा शब्द वापरू. कायद्याला सर्वांच्या मताचा जास्तीत-जास्त पाठिंबा असावा. सर्वांनीं मत व्यक्त करावें परंतु नुसतें मत व्यक्त करावें एवढ्यानें भागत नाहीं. तें मत सर्वहित बुद्धीनें व्यक्त केलेलें असायला हवें स्वहितबुद्धि सोडून सर्वहितदृष्टीनें बोललें पाहिजे

### अशा दृष्टीला विशिष्ट मनोरचना

ही जी सर्वभूतहित पाहण्याची दृष्टि ती यावयाला विशिष्ट मनोरचनाच लागते. सर्वहितबुद्धि स्वतःची जागृत रहावी

म्हणून अहर्निश प्रयत्न करावे लागतात. जागृत अनुसधान असावें लागतें. समाजातील काहीं व्यक्तींनीं तरी असे सतत प्रयत्न करायला हवेत यासाठीं काहीं व्रतें पाळावीं लागतात सत्य, अहिंसा, असग्रह इत्यादि व्रतें आचारात आणावीं मला जर लोभ असेल, माझें हित कशात गुतलेलें असेल, एखाद्या गोष्टींत माझे हितसबध असतील तर माझी दृष्टि सत्यदृष्टि होणे कठीण ती भूतमात्राच्या हिताचा विचार मग कसा करील ? विशिष्ट हितसबध फक्त पाहण्याची मग सकुचित दृष्टि आपली होते आणि ती आपली स्वार्थी दृष्टीच सर्वांचें हितहि पाहणारी आहे, असा आपण बुद्धि वाद लढवून दावा करीत असतों याला मानसशास्त्रात (Rationalising) म्हणतात म्हणजे विवेकीकरण मानस शास्त्रातील विवेकवाद किंवा बुद्धिवाद तो हा स्वत ला जें पटलेलें असतें तेंच बरोबर धरून चालावयाचें तेंच बरोबर आहे असें सिद्ध करून दाखवावयाचें मला वाटतें तेंच विवेकाचें असें भासवायचें स्वत च्या स्वार्थाचें विवेकीकरण करायचें माझ्या बुद्धीला ज्या अर्थी पटलें आहे त्या अर्थी तें योग्य असलेंच पाहिजे परतु तुझ्या बुद्धीला तुझ्या हिताच्या दृष्टीनें पटलें, इतर गोष्टी पाहि ल्यास का ? न्याय, अन्याय, नीति, अनीति इत्यादींचा विचार केलास का ? दुसऱ्याच्या कल्याणाचा विचार केलास का ? तें काहीं नसतें माझा स्वार्थ म्हणजेच न्याय, म्हणजेच परमार्थ, इतरांचेंहि कल्याण ! ज्या वेळेस स्वत च्या स्वार्था लाच मनुष्य न्यायाचें रूप देतो, न्यायाचें आवरण त्याच्या वर घालतो, त्यावेळेस त्याचे विचार सत्य म्हणून कमे मानता

येतील ? येथें इंग्रजांचें राज्य असावें कीं नसावें असा प्रश्न विचारला तर कोणी स्वत:ची जबाबदारी टाळण्यासाठीं इंग्रजी राज्य असावें असेंहि म्हणेल. नसावें म्हटलें तर तें दूर करण्याची जबाबदारी येते कधीं कधीं कोणाचे इंग्रजांशीं हितसंबंध असले तर तेहि म्हणतील कीं, इंग्रजी राज्य असावें. हितसंबंध म्हणून किंवा जबाबदारी टाळण्यासाठीं म्हणून अशा प्रकारें कोणीं उत्तर दिलें तर ते सत्य कसें असू शकेल ?

सत्यासाठीं विचार, आचार, उच्चार यांत संगति हवी. जो सत्याग्रही असतो तो बोलल्याप्रमाणें वागतो. माझ्या विचारानुरूप मी वागू लागलों तर माझ्या स्वार्थाला धक्का पोंचेल. मग कसें करूं असें म्हणणारा सत्याग्रही कसा होऊं शकेल ? कोणी कोणी आपली भीति, आपला स्वार्थ यांना लपविण्यासाठीं दांभिकपणानें अमुक योग्य नाहीं, तमुक बरें नाहीं असें म्हणतात समजा, देश स्वतंत्र व्हावा असें त्याला मनांत वाटतें, परंतु तसें म्हणेन तर धडपडावें लागेल. नाहींतर कमकुवतपणा कबूल करावा लागेल. त्याची तर लाज वाटते. म्हणून म्हणायचें कीं, " अशा वेळेस लढा नको आपण तरी अजून कोठें लायक आहोंत ? " परंतु हा दंभ असतो दांभिक माणसापेक्षा कमकुवतपणा प्रामाणिकपणें कबूल करणारा मनुष्य अधिक थोर होय. तो म्हणेल " देशासाठीं लढलें पाहिजे. देश स्वतंत्र व्हायलाच हवा परंतु मी कुटुंबवत्सल पडलों तितका त्याग, तितकें धैर्य मजजवळ नाहीं. दांभिकापेक्षा हा बरा.

परिग्रही मनुष्य सत्यनिष्ठ राहू शकत नाहीं कोठें तरी लोभमोहांत तो गुंततो. तो दावा करील कीं, हें सारें

इतराच्याहि हिताचें आहे. तो युक्तिवाद शोधील. संग्रह करायला युक्तिवाद शोधील समाजाचेंहि यात हितच आहे म्हणेल परतु ही सत्याग्रही दृष्टि नव्हे. सत्याग्रही मनुष्याला दारिद्र्यातच श्रेष्ठ प्रतीचा आनंद वाटतो. परिस्थितीनें येणारें दारिद्र्य निराळें आणि आपण होऊन दारिद्र्याचा स्वीकार करणें हें निराळे. परिस्थितीमुळें दारिद्र्यात रहायला लागणें ही हिंसा आहे, स्वेच्छेनें तें स्वीकारणें ही अहिंसा आहे. बाह्यतः दोघे दरिद्री दिसले तरी एक असंग्रहाच्या, अपरिग्रहाच्या व्रतामुळें दारिद्री आहे, दुसरा निरुपाय म्हणून आहे. समाजातील दारिद्र्य दूर करणें कर्तव्यच आहे दारिद्र्य जें परिस्थितीमुळें आहे तें जर दूर केलें नाहीं तर समाजात अहिंसा कशी येणार आणि सत्यनिष्ठा तरी कशी येणार? दरिद्री मनुष्याला अनेकदा परिस्थितीमुळें खोटें बोलावें लागतें. दारिद्र्य दुर्गुणाची जननी आहे असें म्हणतात. समाजात सत्यनिष्ठा अधिकाधिक यावयाला हवी असेल तर दारिद्र्य नष्ट करण्याशिवाय गत्यन्तर नाहीं. परतु दारिद्र्य दूर केल्यानें सत्यनिष्ठा वाढते असें आपण म्हटलें तरी त्यालाहि मर्यादा आहेत. आर्थिक परिस्थिति सुधारल्यानें नैतिक परिस्थिति सुधारते, परंतु अधिक पैसा जवळ झाल्यानें अध.पातहि होतो. कोठें तरी मर्यादा हवी. एवढें तरी प्रत्येकास मिळालें पाहिजे अशी समाजानें व्यवस्था करायला हवी. त्यामुळें नैतिक वातावरण उन्नत व्हायला मदत होते.

सामान्य जनतेची गोष्ट निराळी परतु जो सत्याग्रही आहे तो स्वेच्छेनें व्रत म्हणून दारिद्र्य स्वीकारतो. परिस्थितिशरण तो नसतो. परिस्थिति प्राप्त झाली तरी तो श्रीमंत होऊ

इच्छिणार नाहीं. परिस्थितीमुळें मी दरिद्री आहें म्हणून तो रडत कधीं बसणार नाहीं. सर्वांनीं स्वेच्छेनें दारिद्य पत्करावें, सर्वांनीं स्वेच्छेनें त्याग करावा त्यात सेवा आहे, उन्नति आहे. सर्व राष्ट्र जर ही दीक्षा घेईल तर जगाला आपण शान्तीचा रस्ता दाखवूं शकूं

सत्याग्रही मनुष्यानें तरी आपल्या व्रतांशीं निष्ठावंत रहावें. जो सत्याग्रही नाहीं तो अडचणींत सापडला, गांगरला आणि त्यानें हिंसा केली तरीहि चालेल. भित्रेपणापेक्षा हिंसा बरी. अन्यायाला हिंसेनें तोंड द्या. गांधीजींनीं या मर्यादा सदैव सांगितल्या आहेत. परंतु अहिंसेचें व्रत घेतलेल्यानें कशीहि परिस्थिति असो, हिंसा करूं नये. कांहीं तरी अविचल आदर्श समाजांत हवेतच.

महात्माजींनीं बोरसद, खेडा या जिल्ह्यांतून सत्याग्रह केले. परंतु व्हाइसरायला त्यांनीं आधीं पत्र पाठविलें होतें. ते त्यांत म्हणाले, "मी साम्राज्याची सेवा केली आहे. मी युद्धांत लोकांनीं भाग घ्यावा म्हणूनहि प्रचार केला राजनिष्ठा दाखविली आज कायदे मोडून राजनिष्ठा दाखवीत आहें. कायदे पाळून राजनिष्ठा प्रकट होते कधीं कधीं कायदे मोडून राजनिष्ठा प्रकट करावी लागते ब्रिटिश कितीहि अन्यायी असले तरी सत्याग्रहीसमोर ते नमतात, ही गोष्ट लोकांना कळली तर ती किती चांगली ! सत्याग्रह करून मी ब्रिटिश साम्राज्याची सेवाच करीत आहें" असें महात्माजी म्हणत. सत्याग्रही लहान सेवा करो, वा मोठी करो, ती सेवा एक प्रकारें समाजाची, राष्ट्राची, जगाची असते. कारण ती सर्वांच्या हिताशीं अविरोधी असते कायदे मोडूनहि मी

साम्राज्यसेवाच करीत आहे असें महात्माजी म्हणत, याचा अर्थ काय, भावार्थ काय ? मी राजनिष्ठा दाखवीन असें ते म्हणत, यातील अर्थ असा कीं, जोंपर्यंत सेवेचें, कर्तव्याचें पालन मला कायदे पाळूनहि करता येत असेल तोंवर मी राजनिष्ठ राहीन लोकानाहि राहायला सांगेन परंतु कर्तव्य-कर्म पार पाडता येत नसतील तर मी एकटाच नाहीं, तर जनतेलाहि जागृत करून मी कायदे मोडीन. कायदे मोडा नि कर्तव्यें पार पाडता येतील अशी परिस्थिति निर्मा असें मी सांगेन लोकाची सुप्त शक्ति जागृत करीन कर्तव्याच्या आड येणाऱ्या राजसत्तेविरुद्ध अप्रीति उत्पन्न करणें हा तर मी माझा धर्म मानतों आणि हा माझा वा सर्वांचा सत्याग्रह कशासाठीं ? सत्ताधारी लोकानाहि सत्य पटवण्या साठीं सत्तावाल्याची सुप्त न्यायबुद्धि, सुप्त मानवता जागृत करण्यासाठीं, त्याना माणसें बनवण्यासाठीं सत्याग्रही व्यक्ति हिंसेचा मार्ग न पत्करता आत्मक्लेशाचा मार्ग पत्करील. महात्माजी म्हणत, ब्रिटिशाना उद्देशून म्हणत, " माझा हा सत्याग्रह, माझा हा असहकार तुमच्याहि हिताचा आहे माझ्या हितासाठीं जसा तो आहे, तसाच तुमच्याहि मी अन्याय सहन करीन मुकाट्यानें, तर माझाहि अध पात, आणि तुम्हाला करू देईन, तुमची मनोभावना, सद्भावना जागृत न करीन तर तुमचाहि अध पात अन्याय करणारा नि मुकाट्यानें अन्याय सहन करणारा, दोघे अध पतित होत असतात सत्याग्रह दोघाना उन्नत करतो पुन्हा आत्मक्लेशाच्या मार्गानें. म्हणून यांत सर्वभूतहितबुद्धि आहे मला जी सत्य संवेदना होते, ती मी पुन्हां पुन्हा सशोधून पाहीन चले

जावच्या वेळेस महात्माजी अनेकदां म्हणाले, "मी ब्रिटिशांना सत्ताधारी म्हणून येथून जा असें म्हणतों. तसें म्हणतांना माझ्या मनांत द्वेष नसतो. त्यांनीं मित्र म्हणून येथें रहावें. माझ्या अंतःकरणांत मी पुनः पुन्हा शोधून पाहतों कीं, कोठें द्वेष लपलेला नाहीं ना? जर ब्रिटिश हिंदुस्थानवरची सत्ता सोडतील तर त्याचा नैतिक परिणाम जगावर होईल. त्याना हें करायला लावणें माझें काम आहे." महात्माजी अशा रीतीनें सत्याग्रहांत इतराच्याहि उद्धाराचा विचार करीत. ते त्या वेळेस पुनः पुन्हां म्हणत कीं, "माझें मन मोकळें आहे. मला येऊन पटवा." सत्याग्रही हा मताग्रही नसतो. आपल्या त्या त्या क्षणींच्या विचाराचा तो आत्यन्तिक प्रचारक असतो. परंतु तसें करीत असताहि त्याचें आत्म-चिंतन सुरू असतें. आपलें कोठें चुकत तर नाहीं ना, खोट्या कल्पना उराशीं नाहीं ना धरलेल्या, हें तो पडताळून पहात असतो. ज्या क्षणीं चूक कळली, त्या क्षणीं मग ती हिमालयासारखी का असेना, तो ती सोडतो, दुरुस्त करतो, कबूल करतो. सत्याचा तो उपासक, मताचा नाहीं. सत्य-संशोधन तो कधींहि सोडीत नाहीं. एखादी गोष्ट इतराना मान्य असली आणि सत्याग्रहीला नसली तर तो एकटाहि त्या मार्गाचा त्याग करील. सर्वमान्य सत्य असलें म्हणून काय झालें? माझ्या सदसद्विवेकबुद्धीस पटत नसेल तर! म्हणून महात्माजींसारखा सत्याग्रही सर्वांना मान्य अशा सत्यातहि चूक आहे असें सांगायला कधीं कमी करीत नाहीं. भीति, संकोच या वस्तूच त्यांच्याजवळ नसतात. महात्मा-जींचा नि व्हाइसरॉय लिनलिथगो यांचा पत्रव्यवहार आतां

प्रसिद्ध झाला आहे. त्या पत्रांतून महात्माजींनीं सर्वमान्य सत्यांतीलहि चुका दाखविल्या आहेत. ते व्हाइसरॉयला लिहितात, " मी चुकलों अशी माझी अजूनहि खात्री पटवा. मी हें युद्ध, सत्याग्रह बंद थांबवीन. " महात्माजींचा पत्रव्यवहार वाचून कांहींना संशय आला कीं, महात्माजी तडजोड करतील. वस्तुतः त्यांनीं कधींहि अशी तडजोड केली नाहीं. १९३१ मध्यें गोलमेज परिषदेला ते गेले. सर्वांना वाटत होतें कीं, ते कांहीं तरी तडजोड करून येतील. परंतु तसें कांहीं एक झालें नाहीं. सामोपचारानें प्रश्न सुटावे, तडजोड व्हावी अशी त्याना इच्छा असे सत्याग्रही हा उगीचच्या उगीच आगींत उडी घेत नसतो; परंतु तरवारीं तो कधींहि अप्रामाणिक नसतो. तडजोडीसाठीं तो तत्त्वच्युति कधीं होऊं देत नाहीं. आज २०।२५ वर्षें ते आपल्यासमोर आहेत. त्यांनीं तशी तडजोड कधींहि केली नाहीं. ते व्हाइसरॉयाना जेव्हां म्हणतात कीं, मला पटवा, तेव्हा ते सत्याच्या दृष्टीनें म्हणत असतात; तडजोडीसाठीं म्हणून नव्हे. व्हाइसरॉयाच्या बोलण्यांत त्यांना सत्य दिसलें तर ते तडजोड करतील. परंतु ब्रिटिशांना माहीत आहे कीं, इतर लोक एखादे वेळेस तडजोड करतील, तसें गुंडाळून ठेवतील, तात्पुरत्या गोष्टी बघतील; परंतु हा पुरुष तसा नाहीं. मूलभूत सत्याच्या बाबतींत गांधीजी कांहींहि तडजोड करणार नाहींत. चूक दिसली तर सत्य त्या म्हणण्याचा ते कधींहि आग्रह धरणार नाहींत, हेंहि तितकेंच खरें. सत्याग्रही सत्याचा चिरंतन उपासक असतो. मताचा आग्रह सोडायला तयार असणें ही एक सत्याग्रहीच्या जीवनांतील, तत्त्वज्ञानांतील आवश्यक गोष्ट

आहे. सत्याग्रही नि मताग्रही या दोन अत्यन्त भिन्न वस्तु आहेत. मत क्षणिक असतें, मतामतांतून सत्याच्या प्रकाशा कडे जायचें असतें. तो सत्याचा प्रकाश हें सत्याग्रहींचें गंतव्य नि प्राप्तव्य असतें, आणि त्या प्रकाशात त्याला प्राणिमात्राचें कल्याण दिसत असतें. स्वतःचा उद्धार, स्वजनाचा उद्धार, स्वतःच्या शत्रूचाहि उद्धार, त्याला त्यांत दिसत असतो. शत्रु शब्द लौकिक अर्थानें वापरला. वास्तविक सत्याग्रहीला शत्रूच नसतो. तो सर्वांना आपले मानतो. म्हणून तर सर्वांच्या हिताचा तो विचार करतो.

---

## प्रवचन ६ वें

'सत्ये संदृष्टे सिद्धिरात्मनः'— सत्याचें दर्शन झालें म्हणजे सिद्धि मिळते, मोक्ष मिळतो. आपले विचार सत्य, शुद्ध होण्यासाठीं काय काय बरें करायला हवें? मनुष्यामध्यें निरनिराळे गुणधर्म असतात. मनुष्याची बुद्धि त्रिगुणात्मक असते. सत्व, रज, आणि तम या सत्रींच्या कमी अधिक मिश्रणानें आपली बुद्धि बनलेली असते. ती केवळ सत्वमयी कशी करावयाची? कोणती युक्ति, कोणता उपाय? काय करावें, काय करू नये, बंध कशानें, मोक्ष कशानें, निर्भयता कशानें लाभेल, भीति का हें सर्व जी सांगते, याचा विवेक जी करते, काय सोडावें, काय धरावें, हें जी जाणते, ती सात्त्विक बुद्धि.

> अकर्तव्यें बंध भय, कर्तव्यें मोक्ष निर्भय ।
> जाणे सोडूं धरूं, त्यास बुद्धि सात्त्विक बोलर ॥

असें सात्त्विक बुद्धीचें लक्षण भगद्गीतेंत आहे. आणि

रजोगुणात्मक बुद्धि कोणती ? ज्या बुद्धीला धर्म काय, अधर्म काय, याविषयीं स्वच्छ स्पष्ट ज्ञान नसतें ती राजस बुद्धि.

कार्याकार्य कसें काय, काय धर्म अधर्म तो ।
जी जाणू न शके चोख, बुद्धि राजस बोलिल्या ॥

आणि तमोगुणी बुद्धि कोणती ? अधर्मालाच धर्म मानते, जिच्याजवळ प्रकाश नाहीं, सारें उलटेंच जिला दिसतें ती तामसबुद्धि

धर्म मानी अधर्मास, अधारें भरली असे ।
अर्थ जी उलटा देखे, बुद्धि तामस बोलिल्या ॥

जेव्हा आपण म्हणतों कीं, ज्यानें त्यानें स्वत च्या बुद्धीला पटेल तदनुसार वोलावें, वागावें, तेव्हा एक जबाबदारी असते ज्यानें बुद्धि निर्मळ केली आहे, उत्तरोत्तर ज्याचे तदर्थ अखड प्रयत्न चालले असतात, त्यानें तसें केलें तर शोभेल आपण भाधीं बुद्धि सात्त्विक करण्याचा सारखा प्रयत्न करायला हवा अशी बुद्धीच सदसद्विवेक करू शकेल. बुद्धि सात्त्विक व्हावी म्हणून भगवद्गीता काय सागते ? कोणतीं साधनें, कोणते उपाय ? महात्मा गाधी भगवद्गीतेचें सार अनासक्ति म्हणून सागतात फलाविषयीं आसक्ति नसली म्हणजे पुष्कळसें काम होतें परतु अर्जुनासारख्या विशिष्ट जिज्ञासूला फलासक्ति सोड, अनासक्त रहा एवढेंच सागितलें सामान्य माणसाला दोन गोष्टी सागायला हव्यात

१ विषयासक्ति नको
२ फलासक्ति नको

या दोन्ही आसक्ति दूर करण्याचा जाणीवपूर्वक यत्न

माणसाला कळायला हवी. फलाचा सारखा ध्यास घेऊन मनुष्य रजोगुणी बनतो. चावूं कीं खाऊं अशी त्याची वृत्ति होते. 'अयथावत् प्रजानाति' नीट न कळणारी अशी त्याची बुद्धि होते मनुष्यानें कर्तव्यकर्म फलासक्ति नि विषयासक्ति दोन्ही सोडून करावें. त्याला फल मिळणार नाहीं असें नाहीं फल मिळतेंच अनासक्त राहून कर्म करूं तर फल मिळणारच नाहीं, असा भ्रम कोणी निर्माण करतात परंतु तसें नाहीं. गीतेंत अशा अर्थाला जागा नाहीं. फलाची आसक्ति न ठेवून कर्म करणारास उलट सहस्रपट फल मिळतें. त्याच्या उद्योगाचा, अहर्निश कर्माचा का परिणाम होणार नाहीं ? परिणाम होणारच. फलासक्ति राखू तर साधनशुद्धि रहात नाहीं मग मनुष्य मिळेल तें साधन, मलिन, हीन, घाणेरडें, ओंगळहि वापरतो खरें म्हणजे बुद्धीचा एकदा स्थिर निश्चय झाला कीं मग त्या निश्चित साधनेंतच माण सानें तन्मय होऊन गेलें पाहिजे साधन बरोबर असेल तर फल मिळालेंच पाहिजे सृष्टीची ही सहज नियति आहे. सृष्टीच्या नियतीवर विश्वसून साधनेंत रमा फल मिळेल मिळे लच फल न मिळालें तर त्याला दुसरी कारणें असतील. परंतु तुम्ही फलासंबंधीं अनासक्त होतात म्हणून फल मिळालें नाहीं असें नका म्हणू शुद्ध साधनांनीं फल मिळेल हा विश्वास बाळगा. अशुद्ध साधनें कदापीहि हातीं घेऊ नका हिंसेंतून चांगला परिणाम कधींहि येऊ शकणार नाहीं आपण हिंसाप्रवृत्त होतों याचें कारण फल लौकर मिळावें अशी आसक्ति असते आसक्तीशिवाय मनुष्य हिंसादि साधनाचा उपयोग करण्याकडे वळणार नाहीं.

याचे नियम जर आचरणात आपण आणले नाहीं तर खऱ्या दृष्टीने अनासक्त होतां येणार नाहीं आणि अनासक्त झाल्याशिवाय सत्य–अहिंसा पूर्णपणें आचरतां येणार नाहींत. अशी महात्माजींची ही मांडणी आहे. म्हणून बुद्धि शुद्ध करून मनुष्यानें तिला शरण जावें. त्या शुद्ध बुद्धीचा मग आदेश ऐकावा. तोच परमेश्वराचा आदेश. शुद्धि होईपर्यंत, चित्त शुद्ध होईपर्यंत ज्ञान मलिन असतें. तोंपर्यंत खरें ज्ञान, सत्य ज्ञान नाहीं. गढूळ पाण्यात प्रतिबिंब, सूर्याचें प्रतिबिंब पडत नाहीं स्वच्छ पाण्यात पडतें तद्वत् ज्ञानाचें, शुद्ध ज्ञानाचें प्रतिबिंब शुद्ध मनोबुद्धींतच पडतें. बुद्धि शुद्ध कशी करावयाची ? तर आत्मनिष्ठ होऊन. आत्मनिष्ठ होणें म्हणजे 'आत्मवत् सर्वभूतानि' ही दृष्टि घेऊन वागणें. सर्वात्मभावना करणें म्हणजेच सर्वांवर प्रेम करणें. म्हणजे शेवटीं काय ? सत्यदृष्टि यायला हवी असेल तर सर्वांवर प्रेम करायला शिकलें पाहिजे. म्हणजेच अहिंसा परमोधर्म या सिद्धान्तावर आपण आलों. सत्य आणि प्रेम किंवा अहिंसा या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. सत्य म्हणजे सर्वांचें हित, म्हणजेच सर्वात्मभाव, म्हणजेच अहिंसा, म्हणजेच प्रेम महात्माजी म्हणतात Truth is God सत्य म्हणजेच परमेश्वर त्याचीच दुसरी व्याख्या म्हणजे Love is God प्रेम म्हणजे परमेश्वर. तुमचें सत्य सर्वात्मभावनेशीं एकरूप नसेल तर तुम्ही स्वहितच बघाल. आणि स्वहित किंवा स्वार्थ आला म्हणजे सत्य कळणार कसें ? सर्वहित म्हणजेच सत्य सत्य कळायला सर्वात्मभाव जागा झाला पाहिजे. अहिंसेशिवाय, प्रेमाशिवाय तुम्हाला सत्य सापडणार नाहीं

येत राहील. याजवीपेक्षां अवास्तव फायदा कोणीच घेऊं शकणार नाहीं. अवास्तव संग्रहहि कोणी करणार नाहीं, करूं शकणार नाहीं. यासाठीं निराळीं नियंत्रणें, समाजानें वा सरकारानें घालण्याची आवश्यकता नाहीं. खुला व्यापार राहो. स्पर्धा राहो. म्हणजे सारा आर्थिक गाडा समाजहिताच्या पंथानेंच जाईल. स्पर्धाच एक प्रकारें नियंत्रण करील. मग दुसरीं कृत्रिम नियंत्रणें कशाला?

### स्पर्धाशास्त्राचा उलटा अनुभव

परंतु या स्पर्धेच्या तत्वज्ञानाचा निराळाच अनुभव आला. जेथें स्पर्धा करणारे तुल्यबळ असतात, त्यांवेळेला कदाचित् सहज आला पडेल. परंतु समाजांत, जगांत तसें नाहीं. स्पर्धा नियंत्रण करूं शकत नाहीं असा अनुभव आला आहे, येत आहे. मनुष्याची स्वार्थबुद्धि स्पर्धा सर्वव्यापी होऊं शकणार नाहीं अशी युक्ति शोधून काढीत असते. जगांत, समाजांत आर्थिक विषमता असली कीं स्पर्धा सर्वत्र होऊंच शकत नाहीं. कारण स्पर्धेचीं साधनें समान नसतात. मागें एकदां ब्रिटिशांनीं सांगितलें कीं, "हिंदुस्थानांत ब्रिटिश व्यापारी आणि देशी व्यापारी यांना समान सवलती द्या. पक्षपात नको." तेव्हां गांधीजींनीं लिहिलें होतें कीं, "ब्रिटिश कंपन्यांनीं कोटयवधि नफा आजवर मिळविलेला आहे. हिंदी कंपन्या नवीन. या दोघांना मोकळेपणें स्पर्धा करूं देणें म्हणजे प्रचंड राक्षस आणि एखादा बुटबैंगण ठेंगू मनुष्य यांनीं मोकळेपणानें कुस्ती करावी असें म्हणण्याप्रमाणें आहे." (It is like a fight between a giant and a pigmy) अधिक भांडवल ज्याच्या-

जवळ आहे, त्याच्याशीं कमी भांडवलवाला स्पर्धा करणार कशी ? आणि जेथें अशी आर्थिक रचना आहे तेथें सर्व-भूतहितबुद्धीनें मतें बनवावीं असें सांगून काय फायदा ? जेथें स्पर्धा आहे, स्वार्थ तेजाळ आहे, तेथें सत्य, अहिंसा यांना कोठलें स्थान ? जेथें स्वार्थ नि स्पर्धा आहेत तेथें सर्वात्मभाव नाहीं, म्हणजे सत्यहि नाहीं कारण सर्वात्मभाव म्हणजेच सत्य असें आपण वर पाहिलें. सत्य आणि अहिंसा यांच्याशीं विसंगत अशी आजची समाजरचना आहे. एकीकडे स्वार्थ वधायचा आणि दुसरीकडे सर्वांचें हित लक्षात आणून मतें द्या म्हणायचें हें हास्यास्पद आहे. दिवसाचे २४ तास स्वार्थांत दरडायचे आणि तीन वर्षांनीं जेव्हा मतें द्यायचीं तेव्हा एकदम सर्वभूतहितस्फूर्ति येऊन मतें द्यायचीं हें का शक्य आहे ? ज्या समाजात रोज उठून घटकेघटकेला, क्षणाक्षणाला बुद्धीला स्वार्थाचें वळण लागत असतें, तेथें त्या निवडणुकीच्या दिवशीं एकदम सारे सर्वभूतहित लक्षांत घेऊन मतें देतील असें कसें समजतां येईल ? अशा समाजात रजोगुणी नि तमोगुणीच बुद्धि रहायची. नेहमीं स्पर्धा, स्वार्थ, अधर्मालाच धर्म मानण्याची वृत्ति असें चालतें. स्वार्थसाधू सारे म्हणत असतात कीं, आम्हीच समाजाचे आधार. भांडवलवाले म्हणतात, आमच्यामुळें जग चालतें आम्ही सर्वांचें कल्याण करणारे. आम्ही नसू तर जगाचा संसार कसा चालेल ? अशा रीतीनें स्वार्थान्ध बनून अधर्मालाच धर्म म्हणून हे पुकारतात स्वार्थालाच परमार्थाचें गोंडस रूप हे देतात. सारा दंभाचा पसारा. त्यांना आपण पाप करीत आहोंत हें का कळत नसेल ? परंतु ते

आपली सदसद्विवेक बुद्धि गुंगवून ठेवतात. स्वार्थाला न्यायाचा मुलामा देतात. स्वार्थावर न्यायाचें पांघरूण घालतात. असली ही वृत्ति नष्ट केली पाहिजे. तुम्ही कोणतीहि घटना करा. असली स्वार्थी नि स्पर्धामय वृत्ति राहणार नाहीं असें करा. मत सर्वांना द्या की थोडयाना द्या. ह्या बाह्य गोष्टी आहेत. मनुष्य सुधारला पाहिजे. बाह्य बदल कितीहि केलेत तरी तादृश उपयोग नसतो. मनुष्याच्या अंतःकरणातील दुष्ट वासना, सत्तेची – संपत्तीची आसक्ति, याना नष्ट केलें पाहिजे. या वृत्तीपासून आत्मा, मनुष्याचें मन साफ स्वच्छ राहिलें पाहिजे.

### नैतिक उन्नतीस उपाय ?

परंतु अशी नैतिक उन्नति समाजातील सर्वांची करायची तर उपाय कोणता ? मार्ग कोणता ? मनुष्य पापप्रवृत्त का होतो ? याचें कारण सापडलें म्हणजे उपाय सांपडेल. रोगाचें कारण सापडलें म्हणजे उपाय पाहू; मग उपचारविचार नीट करता येईल. मनुष्य पापप्रवृत्त होतो याला दोन कारणें सांगतात. कोणी म्हणतात कीं, परिस्थितीमुळें मनुष्याला पाप करावें लागतें. दुसरे म्हणतात कीं, त्याच्या ठिकाणी आत्मोन्नतीची भावनाच तितक्या प्रमाणात जागृत नसते. परंतु ह्या दोन्ही कारणांपैकीं कोणतेंहि एक संपूर्णपणें खरें नाहीं. जगात असे किती लोक आढळतील कीं, कोणत्याहि परिस्थितींत जे आत्मोन्नतीच करून घेत असतील ? एवढी जोरदार प्रबलतम आत्मोन्नतीची प्रेरणा कितीजणाचे ठायीं आढळून येईल ? अशीं माणसें दुर्मिळ असतात, अपवादरूपच असतात. बुभुक्षित झाल्यावर विश्वामित्रासारखाहि पाप करायला,

चोरी करायला तयार होतो हें दृश्य पाहिलें म्हणजे असें वाटूं लागतें कीं, विशिष्ट परिस्थितीच माणसाला पापप्रवृत्त करीत असते. आपण पटकन् हे सज्जन, हे दुर्जन अशी वाटणी करून मोकळे होतों. परंतु ज्याना आपण दुर्जन म्हणतों, चोर म्हणतों, जे तुरुंगात येतात, ते ज्या परिस्थितींत होते, तिच्यांत आपण असतों तर आपण कसें वागलों असतों ? त्या परिस्थितींत मी असतों तर असाच नसतों का वागलों ?

" बुभुक्षितः किं न करोति पापं
क्षीणा नरा निष्करुणा भवन्ति ॥ "

भूक पोटात भडकली म्हणजे मनुष्य चोरी न करील तर काय करील ? मनुष्य क्षीण झाला, असमर्थ झाला म्हणजे तो कठोरहि बनतो. दरिद्री माता मुलाला मारते व काम करायला पाठवते. गरीब आई मुलाला नदींत सोडून देते. ते दयेचे पाझर कोठें गेले ? वात्सल्य या सुकलें ? दारिद्र्यामुळें, परिस्थितीमुळें माणसें निर्दय का होतात, पापी का होतात याची उपपत्ति येथें आहे. भौतिक परिस्थितीच पापजननी असते समाजवादी विचारसरणीच्या लोकांनीं या सिद्धान्ताकडे अधिक लक्ष दिलें आहे. दरिद्री लोकांच्या अवस्थेकडे पाहिलें कीं, हें सत्य वाटतें. दरिद्री लोक अधिक पापें करताना दिसतात. मनुष्य दारिद्र्यानें पापप्रवृत्त होतो ही गोष्ट खरी. परंतु जे श्रीमंत असतात ते तरी पुण्यवंत असतात का ? श्रीमंतहि निर्दय असतात. समाज उपाशी असला तरी ते वाटेल तो भाव घेऊन फायदाच बघत असतात. कलकत्याला रस्त्यात लोक मरत होते, बंगालमध्यें लाखों लोक मेले

आणि पुंजिपतींनीं त्याच काळात कोट्यवधि फायदा करून घेतला. श्रीमंत माणसें तुरुंगात जातांना फारशीं दिसत नाहींत, यावरून ते भले आहेत, सद्‌गुणाचे पुतळे आहेत असें नाहीं. कायदे न मोडता पाप करण्याची त्याना पदोंपदीं संधि असते. त्याचें पाप कायद्यात बसत नाहीं असेच कायदे आहेत. चोरी प्रत्यक्ष न करिता अकष्टार्जित धन संपादण्याचा त्याचा मार्ग निष्कंटक आहे, मोकळा आहे दुसऱ्यास त्रास देऊन स्वतः वाटेल तितका पैसा मिळवता येतो असे कायदे आहेत म्हणून श्रीमंत चोरी करताना, कायदेशीर चोरी करताना दिसत नाहीं. तेव्हा श्रीमंत मनुष्य पाप करीत नाहीं असें नाहीं. भौतिक परिस्थिति त्याला अनुकूल तरीहि तो पापीच.

### उपाय कोणता तर ?

समाजात नैतिक बुद्धि जागृत करणें हा शेवटीं मूलगामी उपाय आहे मनुष्यच सुधारायला हवा त्याची मानवता जागृत करायला हवी याह्यागी सामाजिक सुधारणा अपुरी आहे. अंतरंगसुधारणेचें सर्वांत महत्त्वाचें कार्य आहे हें कोणीं करायचें ? राजे लोकानीं कायद्याच्या बळावर, शस्त्राच्या बळावर अन्यायाना पायबंद घातला तरी त्या गोष्टी अपुऱ्या पडतात. सरकारी कायदे अपुरे. आपल्याकडे प्राचीनकाळीं यतिवर्गाचें हें काम असे यतिलोक, नि स्वार्थी लोक समाजात नैतिक बुद्धि रहावी म्हणून खटपट करीत. हे यतिलोकहि जर सत्ता नि संपत्ति घेतील तर न्यायासाठीं ते हिंसा करतील युरोपातील पोपानीं तो प्रयोग केला. पोपच पापाचारी नि व्यसनी, विलासी बनले म्हणून महा

त्माजी म्हणतात कीं, सत्ता नि संपत्ति या-यापासून स्वेच्छेनें दूर राहून समाजात नैतिक बुद्धि वाढेल असें केलें पाहिजे. यति झाले तरी तेही जर सत्ता हातीं घेतील तर अध पतित होतील. गीता म्हणते,

यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमान् लोकान् नाय हन्ति न वध्यते ॥

जो निरहंकारी आहे, त्यनें हिंसा केली तरी ती हिंसा नाहीं महात्मा गाधी म्हणतात, हीं काल्पनिक अवस्था आहे. ते या श्लोकाला अर्थवादरूप मानतात अनासक्तीची हीं अत्यन्त स्तुति आहे हिंसा करूनहि ती ज्याची हिंसा होत नाहीं असा सर्व जगाची केवळ माता होणारा महात्मा कोठून आणायचा ? सर्वसामान्य जगात असा कोणी नाहीं काल्पनिक वाद काय कामाचे ? आता-पर्यंत जगात न्यायाची प्रस्थापना करणारे जे झाले त्यानीं सत्तेच्या, लष्कराच्या, पोलिसाच्या साहाय्यानेंच तें कर्म केलें यतीनें हातीं सत्ता घेऊ नये. मग न्याय कोणीं स्थापायचा ? महात्मा गाधी ज्याला रामराज्य म्हणतात, त्या रामराज्यात का पोलीस, सैन्य असणार नाहीं ? हेंहि एक कल्पनास्वप्न आहे. व्यवहारात उतरल्याशिवाय हीं स्वप्नें काय कामाचीं ? हिंसावादी म्हणतात, आम्हीं हिंसा केलीच तर न्यायार्थ करू. तुमचा कल्पनावाद आम्हाला नको. महात्माजी त्याना म्हण-तात, " हिंसेनें न्याय स्थापू पाहणारे तुम्हीच हजारों वर्षे या स्वप्नात राहिलांत. हातांत शस्त्र घेऊन अध पात थाबवितां येत नाहीं " लोभमूलानि पापानि. मानवी मनांतील लोभ दूर व्हायला हवा. तो शस्त्रास्त्रानीं मूलत दूर करता

येणार नाहीं. लोभाचें उन्मूलन करायला हवें. समाजात नैतिक सकल्पशक्ति प्रखरतेनें जागृत करायला हवी. त्यासाठीं ज्याच्या जीवनात सर्वात्मभाव आहे, जे निरहंकारी, निरपेक्ष आहेत असे आदर्श समाजात हवेत. भाराभर वडबडी-पेक्षा असे आदर्श अधिक कार्य करू शकतात. जो स्वतः उन्नत आहे तोच दुसऱ्याची उन्नति करू शकेल. दुसरे चागले वागतील तर मी चागला वागेन, नाहीं तर ठोशास ठोसा देईन असें म्हणणारा हा नको कोणत्याहि परिस्थितींत जो निरपेक्ष वृत्तींचें पालन करतो असा धगधगीत महात्मा समाजासमोर हवा. त्याची नीति दुसऱ्याच्या वर्तनावर अवलंबून असणारी सापेक्ष नीति नाहीं, प्रतियोगी नीति नाहीं. पूर्णत्वानें नीतीचें आचरण करणाराच समाजात नैतिक इच्छाशक्ति निर्मू शकेल. समाजातील सारींच माणसें जर नीतीनें वागू लागतील तर मग बाह्य बधनाची आवश्यकताच उरणार नाही. असें झाले म्हणजे मग राज्यसस्थाच नको, सरकार नको. आपोआप नैतिक सहकार्यानें मानवी समाज चालत राहील. केवळ आर्थिक सुधारणा केल्यानें, समाजात आर्थिक समता आणल्यानें सरकार ही सस्था नष्ट होणार नाहीं. केवळ आर्थिक समता राज्ययत्रहीन समाज, सहकारी समाज निर्मायला अपुरी आहे. रामराज्य, आत्मारामाचें राज्य निर्माण करायचें असेल तर सत् प्रवृत्तीच जागृत करून असत् प्रवृत्ति समूळ नष्ट केली पाहिजे. महात्माजींचा कर्मयोग, हा अनासक्त कर्मयोग गीतेंतूनच घेतलेला, लोकमान्याचा कर्मयोगहि गीतेंतलाच. लोकमान्याचा राजर्षींचा कर्मयोग आहे तर महात्माजींचा ब्रह्मर्षींचा कर्मयोग आहे.

शस्त्रबल कितीहि न्यायबुद्धीनें नि निरपेक्षवृत्तीनें, अनासक्त रीतीनें वापरलें तरी त्यानें कायमची खरी सुधारणा होणें अशक्य आहे. तात्पुरती मलमपट्टी जरी तात्पुरती उपयोगी पडली तरी तिनें रोग कायमचा दूर होणार नाहीं. आत्म बलानें दुसऱ्याचें आत्मबल जागृत करूनच समाज उन्नत होत जाईल हिंसेचा मार्ग – जवळचा (Short cut) रस्ता वाटतो. म्हणून आसक्तीनें तो आपण उचलतों. परंतु हा जवळचा रस्ता अति लांबचा आहे एवढेंच नव्हे तर ध्येयाकडे तो कधींहि नेणार नाहीं दहा हजार वर्षे हिंसेनें प्रयोग चालले आहेत, तरी फळ नाहींच अन्याय नाहींसा झाला नाहीं, असत्य दूर झालें नाहीं हा मार्ग निष्फल ठरला आहे कोणत्याहि परिस्थितींत अनीति नको धर्म राजानें नरो वा कुंजरो वा म्हटलें तर त्यालाहि फळ भोगावें लागलें त्याचा रथ चार बोटें उंच चाले तो इतराप्रमाणें खालीं आला लोकसंग्रहार्थ खोटें बोलणें वगैरे गोष्टीहि भ्रममूलकच आहेत अशा पळवाटा मग वाटेल तितक्या निघू लागतात आणि अखेर दुष्परिणामच होतात पांड वानीं युद्धात नीति सोडून विजय मिळविला परंतु उपयोग काय ? तेहि मागून रडलेच आणि त्यांचें उदाहरण युद्धात वाटेल तें केलें तरी चालेल हें आम्ही हजारों वर्षे गिरवीत आहोंत त्याचे परिणाम आम्हाला भोगावे लागतच आहेत तेव्हां पांडवानीं युद्धात नीति सोडली ही गोष्ट भली केली कीं बुरी केली, हा प्रश्नच आहे तेव्हा निरपवादपणें निरपेक्ष नीतीचा सर्वश्रेष्ठ मार्ग पत्करणेंच योग्य होय तोहि आचरणें कठीण आहे ही गोष्ट खरी भित्रेपणापेक्षा

उघड हिंसा वरी. भित्रेपणा सर्वथा त्याज्य. भित्रेपणा म्हणजे आत्म्याचा वध. भित्रेपणा म्हणून सर्वांत मोठी हिंसा आहे. आत्म्याची हिंसा टाळण्यासाठीं हिंसा केली तरीहि ती क्षम्य आहे. आत्म्याच्या हिंसेच्या मानानें ती अहिंसाच आहे. पोलंडच्या जर्मनीजवळच्या लढाईला महात्माजींनें अहिंसक म्हटलें, पोलंडनें म्याडपणा पत्करला नाहीं. तोंडानें अहिंसा बोलायची परंतु बाह्य आचार भेकडपणाचे असायचे हा दंभ, हा अध पात सर्वस्वी तिरस्करणीय त्याहून हिंसाहि वरी. हिंसामय क्रान्ति करण्यासाठीं झगडलेत तरीहि चालेल. भेकडपणानें अन्याय सहन करण्यापेक्षां हिंसेनें प्रतिकार करा. समाजात अन्यायाला प्रतिकार करण्याची वृत्ति रहायलाच हवी. ही वृत्तीच समाजांत नसेल तर तेथें समर्थांची खरी अहिंसा तरी कशी दिसणार ? जेथें अन्यायाला प्रतिकार करण्याची शक्ति आहे, वृत्ति आहे, तेथेंच आज ना उद्यां कमी वा अधिक खरी अहिंसाहि दिसू शकेल. भेकडपणापासून अहिंसा फार दूर आहे. महात्माजींची अहिंसा शूराची आहे, हें सर्वांनीं लक्षात घ्यावें. ते कधींहि तुम्ही भेकड बना म्हणून सांगणार नाहींत अहिंसा कळत नसेल तर हिंसा घ्या.

परंतु शेवटीं खरी सुधारणा व्हायची असेल तर अतरंग सुधारूनच होईल. जुने लोक तीर्थांना जावें, व्रतंवैकल्यें करावीं, स्वर्गाचें फळ मिळेल, नरकात जावें लागेल अशी लालूच वा भीति दाखवून सन्मार्गाकडे माणसाला वळवावें असें म्हणत. परंतु हें सर्व बाह्यांग झालें. हे बाह्य उपचार होत. बाह्यांगानें कर्मठपणा वाढतो. त्या क्रिया दांभिक होतात. मनावर संस्कार होत नाहीं. बाह्य चिन्हांनीं आपण मन

सुधारू शकत नाहीं. तें शक्य नाहीं. म्हणून संतांनीं भक्तीचा मार्ग अंत करणशुद्धीसाठीं दिला ज्ञानेश्वर म्हणतात, "अंत - करण सुधारण्याचा मार्ग पुढें आला म्हणजे मग प्रायश्चित्ताचे मार्ग निरुपयोगी ठरतात." नामयज्ञ, जपयज्ञ हाच खरा मार्ग अंत करणशुद्धीचा ध्यास म्हणजेच जपयज्ञ प्रभूचें नाम अंत-करणशुद्धीसाठीं घेणें. अंत करणशुद्धि ही खरी मूलगामी शुद्धि, रोगाचें मूळच नष्ट करणारा हा खरा उपाय ज्ञानेश्वर म्हणतात "कीर्तनाचेनि नटनाचें। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे" प्रायश्चित्त द्यायचें कोणाला? सर्वांचीं अंत करणें च शुद्ध झालीं. "नामाचि नाहीं पापाचें, ऐसें केलें" पापाचें नावच उरलें नाहीं अंतरंगशुद्धि केल्यावर आता प्रायश्चित्ताचे खटाटोप कशाला? आता तीर्थें क्षेत्रें नकोत "तीर्थें ठायावरून उठविजी" असें ज्ञानेश्वर महाराज गर्जून सांगतात.

"यमु म्हणे कवणा यमावें
दमु म्हणे कवाणा दमावें"

यमनियम आता नकोत. आता कोणाचें दमन, कोणाचें नियमन? सारेच निर्मळ झालेले ज्ञानेश्वर महाराज ज्याप्रमाणें बाह्य गोष्टींपेक्षा अंतरंगशुद्धीला महत्त्व देतात तीच दृष्टि आपण घ्यायला हवी तुरुंग, कोर्टें, कायदे, पोलीस, लष्कर, सत्ता, शस्त्रें ह्या बाह्य साधनांनीं खरी न्यायबुद्धि समाजांत येणार नाहीं. जोंपर्यंत तुरुंग आहेत, कोर्टें आहेत तोंपर्यंत समाजांत अन्याय आहे, पाप आहे, हाच त्याचा अर्थ तें दडपून ठेवणें आहे एवढेंच. परंतु या असत् वृत्ति केव्हा मुंडी वर करतील त्याचा काय नेम? सत्याग्रही माणसाची नीति म्हणून अंतरंगशुद्धींतून जन्मत असते आजारी

घडतात, दवाखाने वाढवा, अन्याय होतात, पोलिस ठेवा, तुरुंग ठेवा याचा काय अर्थ ? दवाखाने काढावेच लागणार नाहींत असें करा आरोग्यशास्त्र वाढवा देहाचें आरोग्य नि मनाचें आरोग्य वाढवा म्हणजे दवाखाने, तुरुंग याचा खटाटोप पडणार नाहीं. आरोग्यशास्त्र इतकें वाढवायचें की कोणी आजारीच पडणार नाहीं, तद्वत् नीतिशास्त्र इतकें वाढवायचें, पापबुद्धि इतकी नष्ट करायची की कोणी पापप्रवृत्तच होणार नाहीं ज्या समाजांत देहाचें नि मनाचें आरोग्य नीट राहील असा मनानें नि शरीरानें निरोगी समाज आपणास निर्मायचा आहे. त्यासाठीं सत्याग्रह हा मार्ग आहे. सत्याग्रहव्रतधारी लोक समाजात वाढवावयाचे. सत्ता नि संपत्ति यांच्यापासून दूर असणारे लोक समाजात वाढवावयाचे लोकसंग्रहार्थ म्हणूनहि यांनी हिंसा करायची नाहीं, असत्य बोलायचें नाहीं हिंसेनें लोकसंग्रह, लोककल्याण खरोखर होतच नाहीं हाच मुळीं सत्याग्रही मनुष्याचा ठाम सिद्धान्त असणार, अविचल निरपेक्ष निश्चय असणार. असे लोक जेव्हां समाजात निपजतील वाढतील तेव्हां

' तीर्थें ठायींचीं उठतील
कोणी तरी वैकुंठासि जावें
तों वैकुंठचि केलें आघवें "

वैकुंठास जा ही भाषाच नको भूतलावरच देवाचें राज्य, तें वैकुंठ निर्माण केलें आहे ही जी सतप्रवृत्ति, रामनामाच्या उपायानें, अंत शुद्धि करण्याच्या उपायानें समाज सुधारण्याची ही जी सतप्रवृत्ति तीच महात्माजींच्या सत्याग्रही नीतींत

आहे. महात्मा गांधींची विचारसरणी संतांच्या शिकवणीचाच विस्तार आहे तींतूनच ती वाढत आलेली आहे. समाजाच्या अंतरंगाची सुधारणा व्हावी या गोष्टीवर गांधीजी भर देतात. समाजाची आंतरिक सुधारणा आधीं हवी. केवळ आर्थिक समता निर्मून किंवा केवळ कायद्याचें भय दाखवून खरी सुधारणा होणार नाहीं. समाजात संपत्ति नि सत्ता यांचा मोह दूर ठेवून स्वच्छेनें एक प्रकारची संन्यस्त वृत्ति धारण करून नैतिकशक्ति जागृत ठेवणारे लोक ज्या मानानें निघतील त्या मानानें समाज खरा सुखी होण्याचा संभव आहे. अंतरंगसुधारणा होत गेली तरच सत्ययुगाचा आरंभ सुरू झाला असें म्हणता येईल पूर्णता हें ध्येय आहे. सत्ययुगाच्या ध्येयाकडे जायचें आहे. त्या मार्गानें आपलीं पावलें पडत आहेत कीं नाहीं हें पहावें याची कसेटी कोणती? आपल्या व्यवहारावरून आपलीं पावलें योग्य दिशेनें पडत आहेत कीं नाहीं तें दिसून येईल. हिंदुस्थानातील समाजाचें अंत करण सुधारत आहे कीं नाहीं याची परीक्षा पुढील गोष्टीवरून करावी. येथील राज्ययंत्रावरून ती परीक्षा करता येईल. सरकारला व्यवस्था ठेवण्यासाठीं लष्कर कमी लागतें कीं अधिक? पोलिसांवर खर्च वाढला आहे कीं कमी झाला? यावरून समाजात न्यायबुद्धि वाढली आहे कीं नाहीं तें दिसेल समाजात, राज्यात अन्याय अधिक असेल तर अधिक लष्कर ठेवावें लागेल. न्यायीपणा असेल तर कमी ठेवून भागेल. अन्याय समाजात असेल तर अधिक तुरुंग लागतील. तुरुंगात दोन प्रकारें भरती होते. समाजात अन्याय असतो, समता

नसते, बेकारी असते, दारिद्य असतें म्हणून कोणी परि-स्थितीमुळें चोरी वगैरे करून तुरुंगात जातात. त्याची संख्या अधिक झाली तरीहि समाज नि राज्यपद्धति सडलेली आहेत, असें समजायला हरकत नाहीं. आणि राज्यपद्धतीच्याविरुद्ध कायदेभंग करणारे, न्याय स्थापला जावा म्हणून अहिंसक बंड करणारे तेहि तुरुंगात जातात. ज्या राज्यपद्धतींत अशा दोन्ही रीतींनीं तुरुंग भरून जात असतात, ती नादान राज्य-पद्धति होय. ब्रिटिश राजसत्ता जी हिंदुस्थानात आहे, ती या दृष्टीनें निकामी ठरते. परंतु कॉंग्रेसचे मंत्री मध्यन्तरीं होते त्यानींहि गोळीबार केले त्याचें काय ? होय, त्यानींहि गोळी-बार केले. आदर्श रचनेच्या दृष्टीनें त्यांचा कारभार सदोषच ठरतो. परंतु ब्रिटिशानीं जेथें शतपट केला असता तेथें कॉंग्रे-सच्या कारकीर्दीत केवळ अपरिहार्य म्हणून करण्यात आला. अगदीं जरूरच पडली म्हणून केला. शेवटीं आदर्श सृष्टि, आदर्श राज्यपद्धति दूरच राहणार. आपणास तिच्याकडे जावयाचें आहे. देवाचें राज्य हृदयात आहे. तें हजारों वर्षें झालीं तरी प्रत्यक्ष संसारात अजून दाखल करता येत नाहीं. तें ध्येय दूर असलें, परोक्ष असलें तरीहि तें जवळ आहे. अंत:चक्षूला तें दिसत असतें. कांहींना त्याचा जीवनात अनु-भव घेता येतो. त्या आदर्श जीवनाचा, आदर्श ध्येयसृष्टीचा कोणाला कांहींच अनुभव नसता तर तो आदर्श आहे असें म्हणण्यात तरी काय अर्थ होता ? तें ध्येय दृष्टीस दिसत नसलें तरी अनुभवाला येतें. ही जी अनुभूति ती त्या आदर्श सृष्टीची सत्यता पटवीत असते. ही अनुभूति एका अर्थानें आपणास अत्यंत जवळची आहे. डोळ्यांना होणारा आनंद,

एखादी वस्तु प्रत्यक्ष दिसून होणारा आनंद हाहि जरा दूरचा म्हणता येईल परंतु ज्या गोष्टींची अंतःकरणातच अनुभूति येते, ती जणू जीवनाशीं एकरूप झालेली असते. तो अनुभव प्रत्यक्ष नाहीं, परोक्ष नाहीं त्याला एक विशेष शब्द आहे. तो अपरोक्ष अनुभव असतो इंद्रियातीत परंतु अनुभव असतो. अपरोक्षानुभूति असें तिला म्हणतात डोळ्यांना कधींहि न दिसणारें साध्य संत पदोपदीं अनुभवीत असतात आणि अत्यानन्द अनुभवतात त्यांना ती अनुभूति येत असल्यामुळें त्यांच्या सर्व क्रियेंत विवेक येतो. आदर्शाचा ज्याला अनुभव नाहीं, त्याला विवेकहि नाहीं. आदर्श सृष्टीचा ध्यास अंतःकरणाला लागला कीं विवेक येऊं लागेल महात्मा गांधी म्हणतात, " माझीं ध्येयें मला माझ्या देहापेक्षा, माझ्या हातापायांपेक्षाहि जवळचीं आहेत. " बाह्यतः तीं अत्यंत दूरचीं दिसतात व्यवहारात तीं केव्हां येतील तेव्हां येतील ध्येयाचा हा गुणच आहे कीं, ते अनंत, असीम, अप्राप्य असें सदैव वाटत असतें. The virtue of an ideal is in its boundlessness माणसें अपूर्ण आहेत ध्येयें अनंत आहेत जों जों आपण त्यांच्याकडे जातों तों तों तीं आणखीच दूर जातात " Nearer we go, farther they seem. Still they are nearer to us than our hands and feet " असें महात्मा गांधी म्हणतात. जों जों त्यांच्या निकट म्हणून जावें तों तीं आणखी दूर पळतात तरीहि तीं आपल्या हातापायांपेक्षांही जवळचीं अशीं आहेत कारण आंत तीं स्पष्ट दिसत असतात. अंतःकरणात एक ध्वनि ऐकू येत असतो एक हाक ऐकू येत असते.

तुम्ही म्हणाल तुमचा तो अतर्वानि भ्रम कशावरून नाही ? महात्मा गाधी म्हणतील, हा माझा जड देह खरा की खोटा ही एक वेळ शका येईल माझ्या अस्तित्वाचीच एखादे वेळीं शका घेता येईल परतु त्या आदर्श मूर्तीची शका कदापि येणार नाही तें ध्येय आहे. तो आदर्श आहे तो आदर्श अत करणात आहे त्याचा मजुळ ध्वनि ऐकू येतो तो आपणास सन्मार्गाकडे नेतो कोणी कोणाचें ऐकावें हा सवालच नाही स्वत च्या त्या ध्येयावर अचल श्रद्धा ठेवून जाणें त्या ध्येयाच्या ध्यासानें जें आपण जीवन जगतो तेंच जीवन खरोखर आपण जगलो बाकीचें जीवन, ध्येयहीन जीवन, तें मरणच खरें जगणें तें हें. ध्येयात्मक जीवन कधींच पुरें होत नाही अखड उत्तरायण, उच जाणें, पुढें जाणे उपनिषदें म्हणतात, " जो म्हणेल मला मिळालें, त्याला मिळालें नाही जो म्हणेल मला समजलें, त्याला समजलें नाही " कितीही ध्येयाच्या रोखानें प्रगति झाली तरी ती अत्यल्पच वाटते. हीच मौज आहे जितकी पूर्णतेकडे प्रगति अधिक, तितकी स्वत च्या अपूर्णतेचीहि जाणीव अधिक होत असते आणि मनुष्याला सिद्धींत जेवढा आनन्द नाही तेवढा प्रयत्नात असतो. मी पूर्ण झालों असें वाटून जें समाधान होईल, त्यापेक्षा मी अपूर्ण आहें, मला अधिक प्रयत्न केले पाहिजेत, असें जें असमाधान तें अधिक मोलाचें आहे जॉन स्टुअर्ट मिल म्हणे " सतुष्ट डुकरापेक्षा असतुष्ट सॉक्रेटिस असणें शतपट श्रेयस्कर होय " ( It is better to be a Socrates dissatisfied than a pig satisfied ) मुक्कामावर पोंचणेंच नको कारण तेथें पुढें काय हा प्रश्न उरणार नाही प्रयत्नांतच मला रमू दे उत्तरोत्तर

पुढें जाऊं दे. माझ्या प्रयत्नाना अन्त नाहीं. कारण माझें ध्येय अनन्त आहे. अनंत ध्येयासाठीं प्रयत्नहि अनंतच हवेत. हा जो ध्येयार्थ धडपडींतील परम आनंद, तो ज्याला माहीत नाहीं तो डुकरच होय. तो मनुष्य बाह्यतः असमाधानी दिसेल, परंतु अंतरंगीं तो सुखावलेला असतो. मी पूर्णतेकडे जात आहें ही चिरंत निष्ठा त्याच्याजवळ असते. तो सदैव गतिमान् असतो. कधींहि तो साचीव डबक्याप्रमाणें होत नाहीं, ठोकळेबाज होत नाहीं. महात्मा गांधींचें जीवन हें असें आहे. एक आदर्श डोळ्यासमोर ठेवून ते जात आहेत. त्यात त्याना परम धन्यता वाटते, आणि जगानें याच मार्गानें जावें म्हणून ते अट्टहासानें, श्रद्धेनें स्वतःच्या जीवनाची ज्योत पेटती ठेवून सागत आहेत.

---

## प्रवचन ७ वें

आज शेवटचा दिवस, समारोपाचा दिवस. आज येथें महात्माजींच्या जीवनाचा चित्रपट कलावान् बंधूंनीं चित्ररूपानें मांडला आहे. प्रवचनांतील कल्पनाहि अशा मांडता येतील, असो. आज मी अहिंसेवर विवेचन करणार आहे. महात्माजींनीं जो स्वराज्याचा चोरस सांगितला त्यांत राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक सर्व प्रकारची विषमता जावी असें सांगितलें. आपण चार प्रवचनांत या गोष्टींचा थोडाफार उहापोह केला. पांचव्या नि सहाव्या प्रवचनांत सत्यासंबंधीं विवेचन केलें. कारण जी सर्व प्रकारची विषमता नष्ट करायची म्हणून महात्माजी सांगतात, ती सत्याग्रही मार्गानें नष्ट करायची आहे. सत्याग्रही मार्ग म्हणजे सत्य अहिंसेचा मार्ग. हें सत्य म्हणजे काय याचा खुलासा व्हायला हवा. सत्य आत्मवत् सर्व भूतांनि वृत्ति होण्यात आहे. सत्य म्हणजे सर्वभूतहित असें आपण पाहिलें. आतां अहिंसा म्हणजे काय

पाहू. अहिंसा नि सत्य परस्परपूरक आहेत. किंबहुना एक-रूपच आहेत सत्य म्हणजे सर्वभूतहित म्हणजे सर्वभूतमात्रावर प्रेम असेंच नाहीं का होत ? अहिंसा नसेल तर सत्य नाहीं. अहिंसेनेंच आपण सर्वांवर प्रेम करूं. म्हणजेच सर्व-भूतहितरत बनू. म्हणजेच सत्यप्राप्ति करून घेऊं. अहिंसे शिवाय सत्यप्राप्ति, सत्यदर्शन नाहीं. ही जी गांधीजींची निष्ठा तिच्याविषयीं आज चार शब्द सांगणार आहें. सत्याची जी आपण कल्पना घेतली. तिच्या निरनिराळ्या अर्थांनें सदर्भांत आपण पर्याय शब्द वापरले सामाजिक सत्य म्हणजे न्याय न्यायबुद्धि म्हणजे सर्वभूतहित बुद्धि, सर्व समाजाच्या हिताची बुद्धि. प्रत्येक मनुष्य केवळ स्वार्थीच असतो असें नाहीं मनुष्य केवळ स्वार्थी नाहीं, केवळ न्यायी आहे. त्याच्याजवळ स्वार्थ बुद्धिहि आहे, न्यायी वृत्तिहि आहे परंतु ही न्यायी वृत्ति, धर्मवृत्ति मलिन होते. स्वार्थी वृत्तिच बळावते. नि स्वार्थ बुद्धि ही एक निष्ठा आहे ती सर्वांजवळ नसते परंतु तिचा आधार घेतल्यावाचून समाज सुखी होणार नाहीं. प्रत्येकानें आपापला स्वार्थ साधावा असें आपण म्हणू तर कोणालाच संतोष मिळणार नाहीं. समाजरचना अशा अनिर्बंध रीतीनें कशी पाळणार ? समाजाची उभारणी सेवा, न्याय, कर्तव्य यावर करायला हवी. आजची समाजरचना स्वार्थ नि स्पर्धा यांवर उभारलेली आहे. मानवसमाजाला ही लाजिरवाणी गोष्ट आहे- मानवाला हा कलंक आहे. सेवा व कर्तव्य यांच्या आधारावर समाजाची उभारणी करावी अशी महात्मा गांधींची इच्छा आहे. आज जगांत जें राजकारण नि अर्थकारण रूढ आहे त्यामुळें त्यांना दु ख होतें. त्याचा

विचार करताना मनाला खेद झाल्याशिवाय रहात नाही असें ते म्हणतात. ते म्हणतात कीं मानवी व्यवहारात कर्तव्य, न्याय, सेवा हीं तत्त्वें येतील तरच उन्नति शक्य आहे. आपल्या सर्वांच्या व्यवहारात सत्य म्हणजेच सर्वांच्या कल्याणाची इच्छा आणि अहिंसा म्हणजे सर्वांवर प्रेम या दोन गोष्टी दाखल होतील तर किती छान होईल! हीं तत्त्वें जोंपर्यंत व्यवहारात येत नाहींत, तोंपर्यंत कितीहि इतर सुधारणा केल्या तरी मानवी उन्नति होईल, सर्वांना खरें सुख प्राप्त होईल असें वाटत नाहीं. आर्थिक, राजकीय सर्वच व्यवहारात धर्मबुद्धि हवी. महात्माजींची धर्मकल्पना सर्वजीवनव्यापी आहे. सारेच व्यवहार मानवाच्या हित-बुद्धीनें केले पाहिजेत. आज जगात युद्धें आहेत. का? तर सर्वत्र स्पर्धा नि स्वार्थ याची चलती आहे. हीं आज जीवनसूत्रें आहेत. स्पर्धा नि स्वार्थ जायला हवीं असतील तर निराळी समाजरचना हवी. महात्माजींचा चरखा, त्याचा ग्रामोद्योग, या गोष्टींकडे आपण अशा दृष्टीनें पाहू तरच त्यातील अर्थ कळेल. चरखा, ग्रामोद्योग याची कास धराल तर युद्धें जातील. अहिंसक समाज निर्मायचा असेल तर त्याची कास धरावी लागेल. चरखा म्हणजे अहिंसेचें प्रतीक. महात्माजी असें म्हणतात यातील भावार्थ काय? युद्धें टाळणें आणि ग्रामोद्योग याचा संबंध काय? महात्माजी म्हणतात, आजचीं युद्धें का आहेत हें लक्षात घ्याल तर मग माझ्या ग्रामोद्योगानें युद्धाचें कारणच उरणार नाहीं हें तुमच्या लक्षात येईल. ब्रिटिश लोक हिंदुस्थानवर सत्ता चालवू इच्छितात. का? केवळ सत्तेसाठीं सत्ता त्याना नको आहे.

त्याना व्यापार हवा आहे. व्यापारासाठीं त्याना येथें सत्ता हवी आहे. परतु आपण जर ग्रामोद्योगाचें ध्येय केलें, ग्रामोद्योग हा जीवनधर्म केला तर ? ग्रामोद्योगानींच गावच्या आवश्यक गरजा आपण भागवू लागलों समजा येथील बेकारी आम्हाला नाहींशी करायची आहे, म्हणून आम्ही आमच्या गांवातच वस्तू निर्मून त्याच वापरण्याचा निश्चय केला आहे, अशी समजा आपण घोषणा केली तर येथें सत्ता चालवायला कोण येईल ? जीवनाला आवश्यक अशा गरजाच्या बाबतींत जर आपण सारे स्वावलंबी झालों तर साम्राज्यवादी येथें राज्य करू इच्छिणार नाहींत येथें सत्ता चालवण्याची त्याची इच्छा नाहींशी होऊन जाईल. गांधीजींची अशी ही विचारसरणी आहे मोठमोठे कारखाने काढून सपत्तीचें केन्द्रीकरण आणि त्याचबरोबर सत्तेचेंहि केन्द्रीकरण करून सर्व जगात एक राज्य स्थापण्याचा हा काळ आहे असें कोणी म्हणत असतात. जागतिक दळणवळण वाढलें आहे, त्यामुळें आज व्यापारहि सर्वत्र पसरेल. त्यातच अधिकाधिक जगाचें कल्याण आहे सारें जग जणू एक होईल परतु असें सागणारे कितीहि सागोत, आम्हाला एक गोष्ट दिसत आहे कीं, आजचें दळणवळण हें लुबाडण्यासाठीं आहे अपहरण करण्यासाठीं हें दळणवळण वाढवण्यात आलें आहे हें केन्द्रीकरणहि अशासाठी की, कोणत्या तरी राष्ट्राचें प्रभुत्व सर्व जगावर व्हावें जर्मनी, जपान, अमेरिका, इंग्लंड यासाठींच लढत आहेत. जर्मनीचा पाडाव होईल असें दिसत आहे. इंग्लंड, अमेरिका अखेर विजयी होतील. इंग्लंडहि अमेरिकेचें आर्थिक गुलाम होईल. अमेरिका जगा-

वर प्रभुत्व — आर्थिक प्रभुत्व राखू पाहील. सर्व संपत्ति अमेरिकेंत केन्द्रीभूत होईल म्हणजे सत्ताहि तेथेंच. रशिया आणि अमेरिका यांची पुढें चुरस लागेल महात्मा गांधी म्हणतात, हीं युद्धें थांबायचीं नाहींत एक महायुद्ध संपून दुसरें वीस वर्षांनीं आलें. हें दुसरें संपून तिसरें पुन्हा येईल हीं युद्धें थांबवायचीं असतील तर संपत्तीचें केन्द्रीकरण करण्याचा प्रकार नष्टच करायला हवा आपापल्या आवश्यक गरजा तेथले तेथलेच लोक उत्पन्न करायला उभे रहायला हवेत यांत स्वदेशी भावना आहे माझ्या शेजारचे लोक ज्या वस्तु करतात, त्याच मी घ्याव्या त्यांत शोधबोध करावे सुधारणा कराव्या शेजारच्या, जवळच्या बांधवांचे धंदे सुधारून त्यांची उन्नति करावी आणि त्या वस्तूंचा मीं उपभोग घ्यावा कोणतीहि वस्तु घेताना ती कोणी निर्माण केली, कोठें निर्माण झाली हें सदैव पाहिलें पाहिजे वस्तु विकत घेताना आपण मोबदला देतों परंतु हा मोबदला कोठें जात आहे, कोणाला मिळत आहे, याची सदैव जाणीव आपणांस हवी ज्याला मोबदला जातो त्याचें पोट भरतें कीं नाहीं ? मोबदला दिला तो योग्य आहे कीं नाहीं ? याचा विचार वास्तविक करायला हवा आजचें देवघेवीचें सूत्र "स्वस्तांत स्वस्त विकत घेऊन, महागांत महाग विकायचें" असें आहे To buy in the cheapest and sell in the dearest market अमेरिका, जपान वगैरे देश जेथें स्वस्तांत स्वस्त माल मिळेल तेथून घेतात आणि जेथें महागांत महाग किंमतीस विकता येईल तेथें विकतात. परंतु अशा या व्यवहारांत न्यायबुद्धि नाहीं मीं जर स्वस्तांत स्वस्त वस्तु घेतली

तर ती महागात महाग करून का विकावी ? वस्तु अत्यंत स्वस्त मिळते. का मिळते ? त्याचा तुम्हीं विचार करायला हवा. नाहीं तर घोर पातकें तुम्ही कराल. समजा, एखाद्या गावाला आग लागली. जळून गेलीं घरेंदारें त्याचे कोळसे झाले. हे कोळसे स्वस्त म्हणून विकत घेताना तुम्हाला आनंद वाटेल का ? स्वस्तात स्वस्त बाजारात विकत घेण्याचा हाच प्रकार आहे मीं माल खरेदी करून ठेवायचा आणि ज्या लोकांना त्याची जरूर त्यांना तो चौपट पाचपट किंमतीस विकायचा हें बरें का ? महात्मा गांधी ही वृत्ति कशी सहन करतील ? तो सद्‌व्यवहार नाहीं. मी माझ्या धंद्यानें समाजाची सेवा करीत आहे ती विशिष्ट सेवा मला करता यावी म्हणून काहीं फायदा मी घेणें योग्य आहे. जरूर तेवढाच फायदा मी घ्यावा समाजानें नियंत्रण घातलें नाहीं, सरकारनें घातलें नाहीं, तरी आपण होऊनच स्वतःला नियंत्रण घालून घेतलें पाहिजे. वाटेल तितका फायदा घेणें ही आसुरी वृत्ति आहे स्वस्तात स्वस्त विकत घेऊन महागात महाग विकणें हा अन्याय आहे. चरखासंघाची मांडणी करतांना महात्माजींनीं सांगितलें होतें कीं, आठ तास काम करणाऱ्यांना पोटभर तरी मजुरी देता आली पाहिजे. महाराष्ट्रानें हा प्रयोग केला होता. आठ तास सूत कातलें तर चार सहा आणे तरी मजुरी मिळावी. सूत कातणाऱ्याला किती मिळतें हा महत्त्वाचा प्रश्न आहे श्रम करणाऱ्याला किती मिळतें याचा विचार न करता माल निर्माण करणें हें योग्य नाहीं. श्रम करणाऱ्याच्या आवश्यक गरजा भागतात कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. महात्माजींच्या प्रयोगात ही दृष्टि असे काहीं मोठे

कारखाने झाले म्हणजे माझ्या देशातील संपत्ति वाढली असें नाहीं. लाखों खेडीं आहेत. तेथील संपत्ति वाढली का ? संपत्तीची विभागणी होत आहे का ? का एके ठायीं ढीग आहेत ? ज्यानें सेवा केली त्याला संपत्ति मिळते कीं नाहीं हें मी पाहीन असें महात्मा गांधी म्हणतात. मी ज्याला राबविलें, श्रमविलें त्याच्या पोटाला काय मिळालें ? दुसऱ्यापासून वस्तु विकत घेताना त्याला कष्ट किती पडले, त्याचा योग्य मोदला त्याला मिळत आहे कीं नाहीं, त्याच्या आवश्यक गरजा भागतील इतपत त्याला मिळालें तरच तो पुढें काम करूं शकेल, हे सारे विचार गांधीजींच्या अर्थशास्त्रात आहेत. हें सारें करून मग थोडी संपत्ति मला मिळाली तरी ती हितावह आहे. ती यज्ञशिष्ट संपत्ति आहे.

कोणी विचारतात कीं, आजच्या काळीं तुमचा हा स्वदेशीधर्म संकुचित नाहीं का ? आपल्या प्रान्ताचा, खेड्याचा विचार करणें संकुचितपणाचें नाहीं का ? हे प्रश्न फोल आहेत. जेव्हा आपण दूरचा माल घेतों तेव्हां त्या दूरच्या लोकांसहि खायला मिळावें असा विचार करून का आपण तसें करीत असतों ? मुळींच नाहीं. वस्तु सुबक आहे, स्वस्त आहे, एवढा हाच विचार मनात असतो. ज्याचा माल आपण घेतों, त्या माल तयार करणाऱ्या श्रमजीवीच्या आवश्यक - गरजा भागतात कीं नाहीं हें आपण पाहिलें पाहिजे. तसें करताना आपलें नुकसान होत असलें तरीहि त्याची भरपाई केली पाहिजे. अशा सेवाबुद्धीनें जेव्हा आपण व्यवहार करूं इच्छितों तेव्हा तो जगातील लोकांशीं कसा करूं शकूं ? माझ्या गावच्या लोकांची सेवा करणें मला सोपें

आहे, सहज आहे. तो माझी गरज भागवील, मी त्याची. सेवावृत्तीचें अर्थकारण असेल तर यांत्रिक उत्पादनानें ते कसें शक्य ? तेथें ग्रामोद्योगच हवा. संपत्तीचें विकेंद्रीकरण आपोआपच होईल. आम्हाला आमच्या गावची व्यवस्था लावणें सोपें आहे. मॅंचेस्टरची सेवा आम्ही करणें कठीण. महात्मा गांधी म्हणतात कीं, संपत्तीचें विकेंद्रीकरण करून आर्थिक व्यवहारातहि अहिंसा आपण दाखल करूं या. ही अहिंसावृत्ति दाखल करायची असेल तर पूर्वीच्या ग्रामसंस्था पुन्हा प्राणमय करायला हव्यात. ग्रामोद्योग सुरू केले पाहिजेत मोठमोठ्या कारखान्यातील मालाशीं स्पर्धेत हा ग्रामोद्योगी माल टिकेल कसा ? याचें उत्तर एवढेंच कीं, गावांतील माल घ्यायचा; बाहेरचा घ्यायचाच नाहीं. गावातील मालातहि सुधारणा करीत जायचें. सुधारणा करायची नाहीं असें नाहीं. मागें वस्तु निर्माण करीत होतों तशाच पुढें कराव्या असें नाहीं. शोधबोध करावे. सेवेची मर्यादा ओळखून जें क्षेत्र असेल तेथें बसून सुधारणा करून माल भरपूर वाढवा. गावच्या वस्तूचा खरा अभिमान असेल तर तिच्यातील दोष दूर करा. ती चांगली करा. सर्वधर्मसमभाव आपण म्हणतों म्हणजे काय ? माझ्या धर्माचा मी अभिमान धरावा; त्याच्या धर्माचा त्यानें धरावा. परंतु माझ्या धर्मातील सर्वच गोष्टी चांगल्या असें मी नाहीं म्हणत कामा. अभिमान याचा अर्थ जे दोष असतील ते काढून गुणांची वृद्धि करणें. दोषाचा अभिमान धरायचा नसतो. अभिमान गुणाचा धरावयाचा. माझ्या धर्माचा मला अभिमान असेल तर मी त्यात सुधारणा करीत जाणें हें माझें कर्तव्य आहे. गांवची

सुधारणा, कुटुंबाची सुधारणा, धर्माची सुधारणा अशीं अनेक कर्तव्यें असतात. माझ्या धर्माचा अभिमान म्हणजे दुसऱ्याना माझ्या धर्मांत आणणें नव्हे. ज्या वातावरणात मी राहिलों, मी वाढलों, तें मला प्रिय असतें मीं त्यांतील वाईट भाग काढला पाहिजे. माझ्या भोंवतालची हवा मला शुद्ध केली पाहिजे. सर्वधर्मसमभाव अशानें येईल. सारे धर्म शुद्ध होत गेले म्हणजे त्याच्यात भाडण राहणार नाहीं.

अहिंसेनेंच जगात खरा न्याय स्थापिला जाईल हा महात्मा गांधींचा सर्व जगाला संदेश आहे. अहिंसावृत्ति पाळली जाण्याची आज तरी कितीशी आशा आहे ? महात्माजी म्हणतील कीं, मी माझ्यापरी खटपट करीत आहें लोकांना सागत आहें. महात्माजी हेहि क्रान्तिकारकच आहेत. ते मुख्यतः सामाजिक क्रान्तिकारक आहेत. परतु राजकारणाच्या अडचणी येतात म्हणून ते राजकीय क्रान्तिकारकहि आहेत. अहिंसा, सत्य याना सोडून व्यवहार सुरू होतात तेव्हां पुन्हा पुन्हा सत्य — अहिंसेवर अधिकाधिक जोर देणाऱ्या व्यक्ति येतच असतात. पूर्वींचे विधिनिषेध आज अपुरे आहेत. एका वेळचे विधिनिषेध दुसऱ्या वेळेस उपयोगी पडतीलच असें नाहीं. आज आपण पुढें गेलें पाहिजे. सत्यपालन करताना, अहिंसा पाळताना दुसऱ्यास त्रास देऊ नका असें सागण्यात येतें. परतु विचार केला तर दुसऱ्यास त्रास होतोच. एक प्रकारची अहिंसेनें आपण सक्ति करीत असतों. माझा मुलगा दुराचारी आहे असें दिसलें तर मी त्याला आधार देणार नाहीं, त्याच्याशीं असहकार करीन असें महात्मा गांधी म्हणतील त्या परिस्थितींत मृत्युहि आला तरी सहकार

करणार नाहीं. त्याचा परिणाम मृत्यूंत होईल अशी कांहीं आधीं कल्पना नसते. हिंसा करावी, मरण यावें हा उद्देश नाहीं. तो सुधारावा हा हेतु. निदान माझ्याकडून तरी जें मला पाप वाटतें त्याच्याशीं सहकार होतां कामा नये, त्या पापाला मदत मी करतां कामा नये. जे असत् व्यवहार करतात त्यांना असत् व्यवहार करून उपजीविका मिळविण्याची संवय जडलेली असते. ही संवय ते सोडीत नाहींत. अशा असत्य व्यवहार करणाऱ्यांशीं मीं जर असहकार केला तर त्यांना त्रास होतो ही गोष्ट खरी. आपण असा त्रास त्याना होईल हें गृहीत धरूनच असहकार करतों. त्रास द्यावा हा हेतु नसतो. परंतु परिणाम तसा होतो. समजा, आपण स्वदेशी धर्म आचरूं लागलों तर इंग्लंडमध्यें थोडी बेकारी होईल. परंतु त्याला इलाज काय? इंग्लंडमधील लोकांनीं निराळी राहाणी स्वीकारावी. हिंदुस्थानांतील धंदे बुडवून त्यानीं सुखांत रहावें ही हिंसा आहे. जगांतील क्लेश दूर करण्याचे दोन मार्ग आहेत.

१ अन्याय चालू ठेवून क्लेश दूर करूं बघणें.

२ न्यायप्रस्थापना करून सत्यावर आधारलेली समाजरचना निर्मिणें.

पहिला मार्ग भ्रामक आहे. अहिंसा म्हणजे दुबळेपणा नव्हे. प्रेम म्हणजे अन्यायहि चालू देणें असा अर्थ नव्हे. ब्रिटिशांवर प्रेम करणें म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानची जी पिळवणूक चालवीत आहेत तिला मान्यता देणें असा अर्थ नव्हे. त्यांचा अन्याय सहन करून मी माझ्या शेजारच्या बांधवांचीं दुःखें कशीं दूर करूं? अहिंसा म्हणजे सत्याची प्रतारणा

नव्हे. इंग्रजानाहि मी सत्य गोष्ट सांगितली पाहिजे कीं तुम्ही अशी दुसऱ्यांची पिळणूक करणें बरें नाहीं. सत्यनिष्ठा कठोर असते. असत्यानें, अन्यायानें सुख मिळत नसतें ही गोष्ट निर्विवाद आहे. न्याय आल्याशिवाय सुख नाहीं. न्याय कशा रीतीनें स्थापावयाचा हा प्रश्न आहे. हिंसेनें न्यायाची स्थापना करतां येईल का ? तो प्रयोग हजारों वर्षें चालला आहे. तो प्रयोग फसला. हिंसेनें न्याय स्थापण्याचा प्रयत्न कधींच यशस्वी होत नाहीं. तात्पुरता प्रयत्न सफळ झाल्याचा भास होतो. बाह्यतः यश मिळाल्यासारखें दिसलें तरी खऱ्या अर्थानें तें यश नसतें. ज्या कारणास्तव हिंसा केली तें कारण सिद्धीस गेलेलें दिसत नाहीं. सशस्त्र क्रान्ति कल्याण-कारी नाहीं, तरी करूं नये असें गांधीजी म्हणतात. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ नीट समजून घेऊ या. म्हणजे बराचसा उलगडा होईल. ते म्हणतात कीं, माझें हें निश्चित मत आहे कीं, सत्याग्रह हेंच भारतीयांचें शस्त्र आहे " सत्याग्रह एव शस्त्र भारतीयानाम् " हें गांधीजींचें सूत्र आहे. ते म्हणतात, " जग तर हिंसेला कंटाळलें आहे. हिंसेनें उद्देश सफल होत नाहीं. हिंसा यशस्वी व्हायला तीहि प्रबळ असावी लागते, आणि ती यशस्वी होते तेव्हा अति यशस्वी होते. इतकी कीं, ज्या लोकशाहीसाठीं म्हणून आपण सशस्त्र क्रान्ति केली, त्या लोकशाहीवरहि ती विजय मिळविते. लोकशाहीहि नष्ट होते. " राजकीय लोकशाही, आर्थिक लोकशाही यावी म्हणून सशस्त्र क्रान्ति. परंतु राजकीय लोकशाही तर नष्टच होते. हुकुमशाह्या अस्तित्वात येतात असा जगाला अनुभव येतो. म्हणून महात्माजी म्हणतात कीं, जग या मारामारीला

निटलें आहे, कटाळलें आहे. रक्तपाती क्रान्ति जगांत यशस्वी होणें शक्य नाहीं असें वाटतें. जगाची गोष्ट सोडून देऊं. भारतात तरी ती यशस्वी नाहींच होणार. येथील जनताच सशस्त्र क्रान्तीला इतका पाठिंबा देणार नाहीं. आणि काहींनीं सशस्त्र होऊन समजा, क्रान्ति यशस्वी केली तरी तिच्यामुळें जनतेचें कल्याण होईल असें वाटत नाहीं. सशस्त्र क्रान्तीनें त्याची गुलामगिरी अधिकच वाढेल, चिरस्थायी होईल. सशस्त्र वर्गाची एक हुकमत स्थापन होईल. जनतेशीं या सशस्त्र वर्गाचा संबंध राहणार नाहीं हातात सत्ता ठेवण्याची त्याची लालसा वाढेल एकप्रकारें परकी राज्यच तें. परतंत्रताच ती. तें स्वराज्य नव्हे सत्तेच्या जोरावर परकीयांनीं राज्य चालवलें काय, स्वकीयांनीं चालवलें काय ? परतंत्रताच ती ज्या स्वराज्यांत प्रत्येकाला हें माझें असें वाटेल तेंच खरें स्वराज्य माझ्या बाजूनें जर सत्य असेल, माझी आत्मक्लेश भोगायची जर तयारी असेल तर मी अन्याय नष्ट करूं शकेन. अशी प्रचीति ज्या राज्यात येते ती लोकशाही. अहिंसेवर उभारलेली लोकशाही जेथें असें करता येणें शक्य नसेल तेथें लोकशाही नाहीं. सविनय कायदेभंग हा प्रत्येकाचा हक्क आहे अहिंसक प्रतिकारात सर्वांना चार शरीरानें धष्टपुष्ट असोत वा अशक्त असोत, मनोधैर्य असलें म्हणजे झालें अहिंसक क्रान्ति यशस्वी व्हायला विधायक रचनाहि मोठया प्रमाणात पाठीशीं असावी लागते. सारेच गोळ्या खायला तयार होतील असें नाहीं सारेच लढयांत भाग घेतील असें नाहीं. शेंकडा कांहीं लोक प्रत्यक्ष सत्याग्रही सैनिक बनतील, परंतु विधायक कार्यांत सारी जनता

सामील हवी. ती उत्कटपणें काम करीत राहातें. आलस्य, औदासीन्य जातें. सारें जीवन जणुं चैतन्यमय होतें. प्रत्येक जण कांहींना कांहीं करीत असतो. या वातावरणाचा फायदा प्रत्यक्ष लढणाऱ्यांस मिळतो सर्व जनतेला एक प्रकारें आपण सारे भाग घेत आहोंत असें वाटतें. सर्व जनता जागृत असल्यामुळें हुकूमशाहीहि येणार नाहीं. हुकूमशाही यायला लष्करी तंत्रच अवलंबिलेलें नसतें. अशी अहिंसक क्रान्ति घडवून आणायची महात्माजींची इच्छा. अशी जी लोकशाही आणायची तेथें कोणतीच हिंसा नको. राजकीय हिंसा नको, आर्थिक नको, सामाजिक नको, धार्मिक नको. परस्पर सहकार्यानें समाज चालेल. अहिंसक समाजरचनेंत ही चतुर्विध हिंसा नको. समाजरचनेचीं हीं जीं चार अंगें तीं निर्दोष असावींत. महात्माजींच्या शिकवणीचें हे सार आहे. जगाच्या अनुभवातूनच मीं प्रेरणा घेतली आहे असें ते म्हणतात. मी कांहीं नवीन सांगतों आहे असें नाहीं जगाचा अनुभव व्यवस्थित रूपानें मी पुढें ठेवीत आहें. आणि ते पुन्हा असें सांगतात कीं, सशस्त्र क्रान्ति दिवसेंदिवस अशक्य होत चालली आहे. लष्करी शक्ति जगात वाढत आहे. ती दिवसेंदिवस अधिक यांत्रिक स्वरूपाची होत आहे. अशा परिस्थितींत सर्वसामान्य जनताहि सशस्त्र झाली तरीहि प्रभावी यांत्रिक लष्करी शक्तीपुढें कोठला प्रभाव पडायला ? जनतेचीं शस्त्रें आणि सद्यःप्राप्त सरकारी सत्तेचीं शस्त्रें यांत जमीन-अस्मानाचें अंतर असणार. म्हणून महात्माजी म्हणतात कीं, युद्धाच्या मार्गानें आपण जाताच कामा नये. आपण पूर्ण अहिंसक वृत्तीनें प्रतिकार करू या हिंदुस्थानात ही वृत्ति

निर्माण झाली तर परराज्यहि येथें राहणार नाहीं आणि देशी लष्करशाहीचाहि संभव नाहीं. जगांत युद्ध आहे. आपणांस त्या युद्धांतून सुटायचें असेल तर हाच मार्ग. देशात अहिंसक क्रान्ति करावयाची. गांधीजींनीं तर कोणत्याहि युद्धात मी कधीं सामील होणार नाहीं म्हणून सांगितलें आहे. राष्ट्रीयसभेची आजची वृत्ति इतकीच कीं " हें युद्ध किमर्थ तें सांगा. युद्धहेतु सांगा. मग आम्ही बघूं. " महात्मा गांधींनीं, जवाहरलालजींनीं राष्ट्रसभेस पुढें नेलें आहे. पूर्वी ब्रिटिश सत्तेशीं सौद्याची भाषा आपण करीत असूं. आतां ती भाषा नाहीं. आतां सौद्याची भाषा असली तरी नैतिक मूल्यें गृहीत धरून ती आहे. युद्ध कशासाठीं आहे ? बोला. आपल्या राष्ट्राची अहिंसेच्या दृष्टीनें ही प्रगतीच आहे. केवळ सौद्याची भाषा असती तर इतर गोष्टींचा आपण विचारच केला नसता. एकच अट घातली असती. हिंदुस्थानला स्वराज्य देतां का बोला. तसें करीत असाल तर तुमच्या बाजूनें लढूं. राष्ट्रीय सभेंत एवढयाहि गोष्टीवर तृप्त होऊन ब्रिटिशांच्या बाजूनें लढूं म्हणणारे कांहीं आहेत. परंतु १४ सप्टेंबरचा जो ठराव त्यांत तशी सौद्याची भाषा नाहीं. त्या ठरावांत ' युद्धहेतु जाहीर करा; ते हिंदुस्थानला कसे लागतां तें सांगा. ' अशी भाषा आहे. तरीहि हिंदुस्थान युद्धांत सामील होईलच असेंहि त्या ठरावांत निश्चित नाहीं. आम्हांला हें युद्ध धर्म्य वाटलें तर विचार करूं. उद्यां चीन तुमची यमाहत व्हावी म्हणून का लढायचें ? चीन ब्रिटिश राष्ट्रसंघांत वा साम्राज्यांत आणायचा असेल तर आम्ही कशी मदत करूं ? राष्ट्रीय

सभा धर्ममय युद्धाच्या भूमिकेवर आहे. नैतिक दृष्टि डोळ्या-समोर ठेवून हें युद्ध आहे असें अभिवचन द्या. हें लोक-शाहीसाठीं असेल तर साम्राज्य सोडा. वसाहतींना स्वातंत्र्य द्या आम्हाला स्वराज्य दिलेंत; परंतु इतर वसाहती परतंत्रच तर आम्ही का म्हणून युद्धांत यावें ? केवळ आमचाच प्रश्न नाहीं महात्माजी ब्रिटिशांबरोबर सौदा करायला तयार नव्हते. महात्माजींची भूमिका राष्ट्रसभेनें सोडली तेव्हाच सौद्याची भाषा आली असें म्हणतात. तसें म्हणणेंहि चूक आहे. आजहि राष्ट्रसभेची सौद्याची भाषा नाहीं. युद्धहेतु पटवा. खात्रीचा पुरावा प्रत्यक्ष रूपांत द्या. हें युद्ध न्यायासाठीं आहे असें आम्हाला पटवा. मग आम्ही लढू म्हणजे नैतिक मूल्यासाठीं लढू अशीच राष्ट्रसभेचीहि भूमिका आहे. राष्ट्रीय कल्याणाची वृत्ति जगत्कल्याणाच्या वृत्तीशीं तिनें जोडली आहे. केवळ स्वत:चा स्वार्थ राष्ट्रसभा बघती तर तिनें निराळी भूमिका घेतली असती. महात्मा गांधी राष्ट्रसभेच्या पुढें जाऊन ' युद्धनिरोधाचा प्रचार करा, सर्वत्र जा ' असें सांगू लागले. " देशावर परकी आक्रमण झालें तर ज्यांना हिंसेनें रक्षण करता येईल त्यांनीं हिंसेनें करावें सत्कार्यार्थ हिंसा असेल तर परवानगी परंतु मी अहिंसेनेंच प्रतिकार करीन " असें ते म्हणाले.

परंतु देशांत जेव्हां चलेजाव लढा सुरू होणार होता तेव्हां त्यांनीं हिंसेला मान्यता दिली नव्हती. जो लढा आता चालला आहे, त्यात अहिंसेची व्याप्ति किती, हिंसेची किती, कोण किती बरोबर, कोण किती चूक तो हिशेब मागून बघा. परंतु एक गोष्ट मान्य केली पाहिजे कीं, आज असा कोणीहि

शंभर टक्के मी हिंसात्मक आहे असें म्हणेल. आमचा लढा स्वार्थासाठीं आहे, सौदासाठीं आहे, तो हिंसात्मक आहे असें कोणी म्हणू शकणार नाहीं. वर्षभर चळवळ चालली. महात्मा गांधींच्या पाठीमागें जनतेनें लढा दिला, अद्याप देत आहे. राष्ट्रीयसभेमध्यें मतभेद असले तरी महात्माजींच्या मागें सारे आहेत. अहिंसापालनाची वृत्ति सर्वत्र उत्पन्न झाली आहे. वास्तविक ब्रिटिशाशीं आपण युद्ध पुकारलेलें, परतु जनतेकडून हत्या क्वचितच झाली. ४० कोटि लोक हिंसा करायची असें मनात आणते तर ते अपार करू शकते. परतु 'प्राण पवित्र माना' अशी घोषणा सर्वांनीं केली. जगाच्या इतिहासात ही अपूर्व गोष्ट होती. शत्रूच्या रक्ताचा थेंबहि न सांडता हा लढा लढवला गेला. ही जी वृत्ति महात्माजींनीं निर्माण केली, ती सामान्य नाहीं. जगाच्या इतिहासांत भर घालणारी ही अपूर्व वस्तु आहे. महात्माजींनीं जगाच्या इतिहासात एक नवीन प्रकरण लिहिलें. अहिंसेच्या मर्यादा लढा चालवणाऱ्यांनीं कितपत पाळल्या, त्यांना त्या कितपत झेपल्या हा वादाचा प्रश्न असला तरी, महात्माजींच्या सत्याग्रहाच्या मर्यादा कोणी सोडून दिल्या असल्या तरी, सत्याग्रहाची वृत्ति महात्माजींनीं जी कोट्यवधि लोकात निर्माण केली, ती इतिहासात नवीन वस्तु आहे यांत शंका नाहीं जो लढा बाहेर झाला, त्याची कोणासहि शरम वाटायला नको सरकारच्या पर्वतप्राय हिंसेच्या मानानें जनतेच्या हातून झालेली हिंसा कणासमान आहे आणि प्राणहत्या तर जनतेनें जवळजवळ शपथपूर्वक वर्ज्यच मानली होती.

महात्माजी जगातून युद्धें जावीं म्हणून हा नवीन प्रयोग

करीत आहेत. ते नवीन मार्ग दाखवीत आहेत. न्याय-प्रस्थापनेसाठींहि हिंसा नको. यासाठीं हा त्याचा नवा युद्ध-प्रकार. अहिंसक युद्धाचा प्रकार. या मार्गाचें ते संशोधन करीत असतात. हिंदुस्थानात ते जो हा प्रयोग करीत आहेत, त्याच्याकडे जगाचें लक्ष आहे. जगामध्यें ध्येयें वाढलीं, साध्यें वाढलीं; परंतु साधनें तींच आहेत. आपलीच साध्याविषयींची भाषा बघा. पूर्वी म्हणत असों कीं, हे परके आधीं येथून जावेत. पुढें म्हणूं लागलों कीं, जें स्वराज्य येणार तें एकतंत्री नको, लोकशाही स्वरूपाचें तें हवें. देशातील सर्वांना मताधिकार हवा. पुढें एवढ्यानेंच सपलें नाहीं. आर्थिक सुस्थिति यायला हवी. सामाजिक समता हवी. समाजवाद एकप्रकारें यायला हवा. परंतु हेंहि अखेरचें ध्येय नाहीं. राजकीय हिंसाच नको असेल तर स्टेटच नको. सरकारच नको. सरकार असणें म्हणजे समाजात थोडा तरी अन्याय आहे हा अर्थ होय. कम्युनिस्टहि म्हणतात कीं, अखेर सरकारच नको. महात्माजीहि एका अर्थी अराजक म्हणजे राज्यसत्ताच नको असें मानणारे आहेत. केवळ सत्य युग यावें. सारे सत्यानें, न्यायानें, सहकार्यानें वागणारे झाले म्हणजे मग सरकार ही वस्तु कशाला? सरकाररूपी संस्थेला खुशाल मग संग्रहालयात ठेवूं. अशा रीतीनें ध्येयें विकसत जात आहेत. परतु ध्येयाच्या उत्तरोत्तर विकासाबरोबर साधनाचाहि विकास होत गेला का? साधनें तींच. बाण जाऊन बंदूक आली. बंदूक जाऊन तोफ आली – परंतु साधनें हिंसेचींच. हिंसेनेंच माणूस माणसास लुबाडतो. हिंसेनेंच साम्राज्यें, हिंसेनेंच समाजवाद, हिंसेनेंच राज्यसत्थाहि दूर

करायची. साध्यें नानाप्रकारचीं. परंतु साधन हिंसेचेंच हा विरोध आहे. साध्यें उत्तरोत्तर थोर असतील तर साधनेंहि थोर वापरा मार्ग शुद्ध न घेता, अंतरंग शुद्ध न करता, साधनें शुद्ध न वापरता प्राप्त झालेलीं ध्येयें मला नकोत, असें महात्माजी म्हणतील पूर्वीच्याच हिंसात्मक मार्गानें जरी सत्ययुगाची प्राप्ति होत असली तरी ती मला नको. ती प्राप्ति नसतेच. तो भ्रम असतो. पाश्चिमात्यांनीं हा भ्रम निर्माण केला आहे. हिंसेनें सारें मिळतें असें त्यांना वाटतें. या मार्गानें उच्च ध्येयें कदापि प्राप्त होणार नाहींत ध्येय उच्च असेल तर साधनेंहि तितकींच उच्च वापरा. तें साधन म्हणजे माझी आत्मशक्ति अंतःकरणाची सुधारणा आधीं सर्वांनीं करू या. ही सुधारणा माझा मींच करायची असते. म्हणून महात्मा गांधींच्या मार्गांत स्वतःची सुधारणा आधीं असते, मग जगाच्या सुधारणेवर भर असतो. अंतरंग सुधारणे-पासून प्रारंभ करून मग जगाच्या सुधारणेकडे वळायचें. परंतु सर्वांनीं अंतःकरणाची सुधारणा करावी असें म्हणून भागत नाहीं. त्यांना तसें करता यावें म्हणून साथ साथ दुसऱ्याहि गोष्टी आणायला हव्यात. महात्मा गांधी एकदा म्हणाले, "लोकांना पोटभर जेवायला जोंपर्यंत मी देऊं शकत नाहीं, तोंवर त्यांना रामनाम घ्यायला तरी कसें सांगू?" अंतरंगाच्या सुधारणेबरोबर बाह्यांगाचीहि सुधारणा करीत राहिलें पाहिजे. एकीकडे मन मोठें नि निर्मळ करीत जाय-याचें, तर लगेच तिकडे त्याचा प्रतिध्वनि राजकीय नि आर्थिक परिस्थिति शुद्ध करण्याच्या रूपानें उमटला पाहिजे. -आंतरिक सुधारणेंतूनच बाह्य क्रियेचीहि सुधारणा.

प्राचीनकाळीं आपल्याकडे याचाहि जणूं श्रमविभाग केला गेला. कांहींनीं केवळ आंतरिक सुधारणेवरच भर दिला. समाजधारणेचा कोणताहि व्यवसाय सोडण्याची वास्तविक जरूर नाहीं. गीतेची अशी शिकवण आहे. महात्मा गांधी हीच देत आहेत. भगवान् बुद्ध आले तरी त्यांनाहि मी नम्रपणें चरखा चालवा असें सांगेन असें एकदां ते म्हणाले. पूर्वी शेतींत हिंसा होते म्हणून कोणी शेतीच सोडली. ब्राह्मणानीं म्हणे शेती करूं नये. हें अयोग्य आहे. असें करण्याची जरूरी नाहीं, एवढेंच नव्हे तर चूक आहे. वेदांतील ऋषि सांगतो —

" कृषिमित् कृषस्व "

'अरे, शेतीच कर' असें वेद सांगतो. शेतीचें काम, भंग्याचें काम हीं दोन्ही कामें महात्माजींना फार आवडतात. सेवेचें कोणतेंच कर्म अपवित्र नाहीं. शेतीचें काम नि स्वच्छतेचें काम — हीं कामें करणाऱ्यांना अत्यन्त मान द्या असें गांधीजी सांगतात. शेतींत हिंसा होत असेल तर ती कमी कशी करता येईल त्याचा शोध करा. शेतीचाच त्याग नका करूं.

समाजाचा व्यवहार सोडायचा नाहीं. तोच व्यवहार सुंदर, उदार ध्येयवादी करायचा. जेथें असाल तेथेंच ठाण मांडून आपापलीं कर्में करीत रहा. आपापलें कर्मक्षेत्र सोडूं नका. जसें आपापल्या जागीं राहूनच भीष्मांचें रक्षण करा, सेनेचें रक्षण करा " यथाभागमवस्थितम् " असें दुर्योधन आपल्या सैनिकांस म्हणाला, त्याप्रमाणें समाजाचें रक्षण, आपापलीं कर्में जेथें असाल तेथें नीट करून करा. धंदे असे घ्या कीं जे समाजपोषक आहेत, न्यायाला पोषक आहेत.

दारूसारखे धंदे नकोत. समाजाचा नाश करणारे धंदे नकोत. आपापल्या कर्मांनीं समाज सुखमय, अहिंसक म्हणजे जेथें अन्याय नाहीं, कोणाला दुःख नाहीं, कोणाचें शोषण नाहीं असा करावयाचा आहे.

**" स्वकर्म – कुसुमीं त्यास पूजुनी मोक्ष मेळवी "**

स्वतःच्या कर्मांनींच ईश्वराची पूजा करा. समाजाची सेवा समाज म्हणजेच ईश्वर समजून करा. जें कर्म कराल त्यात सत्य, अहिंसा आणा सत्य, अहिंसा पाळून जें काहीं कराल तीच समाजाची खरी सेवा होईल. सत्य, अहिंसा सोडून जें कराल त्यानें सेवा न होता उलट हेवाच वाटायचा. हेंच तत्त्वज्ञान. तत्त्वज्ञान म्हणून महात्माजी काहीं निराळें मानीत नाहींत हें सर्वांगीण तत्त्वज्ञान आहे. अंतरंगक्रान्ति हें बाह्य क्रान्तीचें साधन अंतरंग निर्मळ करून समाजाच्या बाह्यांगांत क्रान्ति करू लागलांत म्हणजे सामाजिक, आर्थिक, राजकीय क्रान्तिहि होईल. व्यक्तीचा मोक्ष समाजाच्या मोक्षाशीं महात्माजींनीं जोडला आहे. सभोंवतीं अन्याय, हिंसा असताना त्या वातावरणात मी माझा संपूर्ण मोक्ष मिळवूं तरी कसा? माझ्या मोक्षातहि काहीं तरी दोष, काहींतरी कमीपणा तोंवर राहणार. समाज मुक्त नाहीं तोंवर तुम्हीहि मुक्त नाहीं. म्हणून स्वतःला सुधारीत, स्वतःचीं कर्में सुधारीत समाजहि सुधारूं लागा.

महात्माजींनीं एक नवीन महान् क्रान्तिकारक उभा केला आहे. जो साधु असून क्रान्तिकारी आहे. साधुता आणि क्रान्तिप्रवणता दोहोंचा रम्य संगम ज्याच्या ठायीं आहे असा नवयुगांतील नवा क्रान्तिकारी त्यांनीं उभा केला आहे.

अतरगात क्रान्ति व बाहेरहि क्रान्ति करू पाहणारा, ज्याचें साध्य शुद्ध आहे आणि साधनेंहि शुद्ध आहेत असा हा क्रान्तिकारक आहे महात्माजींनीं अशा सर्वांगीण क्रान्तीची दृष्टि देण्याचा प्रयत्न चालविला आहे. सारे लोक एकदम या मार्गानें जाऊ शकतील असें नाहीं सारा हिंदुस्थानहि या मार्गानें एकाएकी जाईल असें नाहीं. परतु महात्माजींनीं हिंदी राष्ट्रांत एक नवनिष्ठा उत्पन्न केली आहे यात शका नाहीं. सर्वांवर कमीअधिक त्या निष्ठेचा परिणाम झाला आहे. याच मार्गानें जाऊ तर स्वत चें, स्वत च्या राष्ट्राचें, मानव जातीचें कल्याण आहे असें अत करणात सर्वांना वाटू लागलें आहे महात्माजींचें असें हें जीवनदर्शन आहे त्यांनीं दिलेलें सर्व जीवनस्पर्शी असें हें कर्मयोगी तत्त्वज्ञान आहे ही नवीन जीवननिष्ठा स्वत च्या प्रत्यक्ष आचरणानें ते देत आहेत. आज त्याचा बाढदिवस ते बधनात आहेत. परतु त्याचे विचार जगभर जात आहेत, जात राहतील बंधनातून सर्वांना मुक्त करणारें हें तत्त्वज्ञान वाढत जाईल अशी आशा आहे सात दिवस आपण थोडा फार उहापोह केला. आज तो पुरा करू

---